श्रीसयाजी साहित्यमाला पुष्प ३०२

# महाराष्ट्र

लेखक :

विश्वनाथ पांडुरंग दांडेकर,

एम्.ए., पीएच्.डी.

( मराठीचे प्राध्यापक, बडोदा कॉलेज )

आवृत्ति पहिली

ऑगस्ट १९४७

किंमत अडीच रुपये

श्री

# विज्ञापना



आपल्या देशी भाषांतील साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें विद्याभिलाषी कै. श्रीमंत सरकार महाराजसाहेब सर सयाजीराव गायकवाड (तिसरे) सेना खासखेल, समशेर बहादूर, जी.सी.आय ई., एल्एल्.डी. यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रकम निराळी ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्रीसयाजी साहित्यमालें"त विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येतात.

तदनुसार महाराष्ट्र या नांवाचा ग्रंथ डॉ. वि. पां. दांडेकर, एम्.ए., पीएच्.डी., यांजकडून तयार करविला, तो उक्त मालेंतून १०२ रें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

भाषांतर शाखा,
प्राच्यविद्यामंदिर,
बडोदें.

यो. ज. त्रिपाठी,
भाषांतर मदतनीस.

ज्यो. मा. मेहता,
विद्याधिकारी,
राज्य बडोदें.

ता. १५-७-४७.

# डॉ. वि. पां. दांडेकर यांचीं पुस्तकें



| | | | |
|---|---|---|---|
| १ | चारित्र्यसुधा | (कादंबरी) | २- ०-० |
| २ | प्रतारणा | ( ,, ) | १-१२-० |
| ३ | कुचंबणा | ( ,, ) | २- ०-० |
| ४ | फेरफटका | (लघुनिबंध) | १- ०-० |
| ५ | टेकडीवरून | ( ,, ) | १- ०-० |
| ६ | एक पाऊल पुढें | ( ,, ) | १- ४-० |
| ७ | काळ खेळतो आहे | ( ,, ) | ...... |
| ८ | भारतीय समाजस्थिति | (भाषांतरित) | १- ४-० |
| ९ | निवृत्तिविनोद | ( ,, ) | १- ८-० |
| १० | केळकरांचीं सहा नाटकें | ( प्रबंध ) | १- ४-० |
| ११ | श्रीमंत सयाजीराव महाराज | (चरित्र) | ०- ८-० |
| १२ | अर्जुन | ( ,, ) | ०- ६-० |
| १३ | मराठी नाट्यसृष्टि–पौराणिक नाटकें | | ४- ०-० |
| १४ | मराठी नाट्यसृष्टि–सामाजिक नाटकें | | ४- ०-० |
| १५ | महाराष्ट्र | (प्रबंध) | २- ८-० |

पुस्तकें लेखकाकडे "हाथीपोळ नाका, बडोदें" या पत्त्यावर किंवा सर्व प्रसिद्ध पुस्तकविक्रेत्यांकडे मिळतील.

# प्रस्तावना



प्रस्तुत पुस्तकांत महाराष्ट्र देशाची व्याप्ति जैन रविकीर्तीच्या काळापासून म्हणजे इ. स. ६३४ पासून जी मानण्यांत येते आहे, तीच घेतली आहे. नव्याण्णव हजार गांवाच्या व तीन भागांच्या महाराष्ट्राचें वर्णन रविकीर्तीनें आपल्या शिलालेखांत केलें आहे. नागपूर चांद्यापासून ते खालीं कारवार पर्यंत आणि तेथून वर डहाणू दमणपासून ते परत नागपूरचांद्यापर्यंत जो त्रिकोण होतो व ज्यांत मराठी भाषा बोलणारे शेंकडा ८५ ते ९० लोक राहतात, तो भाग महाराष्ट्र म्हणून मी नजरेसमोर ठेविला आहे. यांत पुणें ठाणें कुलाब्यापासून ते चांदा भंडारा गोव्यापर्यंतच्या चोवीस जिल्ह्यांचा समावेश करण्यांत आला आहे. महाराष्ट्र एकीकरणाच्या नव्या कल्पनेंत ज्या प्रदेशांना एकत्र आणण्यांत आले आहेत तेच येथेंहि आणण्यांत आलेले आढळतील. कॉंग्रेसच्या धोरणानुसार भाषावर प्रांतरचना होऊन जें चित्र महाराष्ट्राचें दिसेल तेंच प्रस्तुत पुस्तकांत काढण्यात आलें आहे.

पुस्तकांच्या पहिल्या प्रकरणात महाराष्ट्राचा पूर्वेतिहास देऊन पुढें राजकीय स्थित्यंतरें वेळोवेळीं कशीं होत गेलीं तीं दाखविलीं आहेत. रट्ट आर्योनीं यशस्वी वसाहतकर्म करून दंडकारण्याचें महारट्ठ किंवा महाराष्ट्र कसें बनविलें, आणि त्यांतच पुढें दुसरा पुलकेशी, कृष्णराज राष्ट्रकूट, दुसरा विक्रमादित्य, भिल्लम, सिंघण, शिवाजी, पहिला बाजीरावासारखे एकाहून एक सरस असे वीरपुरुष निर्माण होऊन त्यांनीं महाराष्ट्राचें वैभव कसें वाढविलें, हा इतिहास ह्या भागांत आला आहे. त्यापुढें मराठी भाषेची उत्पत्ति कशी झाली ती सांगून, मराठी साहित्याचें स्वरूप मुकुंदराजाच्या काळापासून ते आजतागायत कसकसें बदलत गेलें, कोणकोणत्या प्रमुख ग्रंथ-कारांनीं मराठी भाषेचें उद्यान सजविण्याच्या कामीं हातभार लाविला, याचें अगदीं थोडक्यांत वर्णन करण्यांत आलें आहे.

विभंगलेला महाराष्ट्र एकरूप झाल्यावर तो स्वयंपूर्ण बनेल किंवा नाहीं, याचा विचार 'कोठें काय होतें ?' या प्रकरणांत केला आहे. सर्वच्या सर्व बाबतींत कोणताच देश हा कधींहि स्वयंपूर्ण शकत नाहीं. परंतु निदान अन्न वस्त्राच्या बाबतींत जरी तो तसा असेल तरी त्यानें पुष्कळच साधलें असें मानायला हरकत नाहीं. या दृष्टीनें पाहतां महाराष्ट्राची स्थिति पुष्कळच चांगली आहे असें आढळेल.

महाराष्ट्र हा डोंगराळ मुलुख असल्यामुळें येथील लोक राकट, कलाहीन व असंस्कृत असल्याबद्दलचा आरोप कांहीं लोकांनीं केला आहे. हा आरोप कसा निराधार आहे याचें सप्रमाण विवेचन महाराष्ट्रांतील प्राचीन शिल्पकला व महाराष्ट्राची कलोपासना ह्या दोन प्रकरणांत करण्यांत आलें आहे. ज्या महाराष्ट्रांत वेरूळ अजंठासारखीं भव्य व रमणीय शिल्पकृतींचीं स्थळें आहेत, शारंगदेव, पुंडरीक विठ्ठलासारखे श्रेष्ठ संगीतज्ज्ञ आहेत, बालगंधर्व, गणपतराव जोशी यांच्या सारखे मूर्तिमंत विविध रस निर्माण करणारे नट आहेत, अजंठासारखी सर्वोत्तम चित्रकला व राजा रविवर्मा, धुरंधर, लाड, बाबुराव पेंटरांसारखे चित्रकार आहेत, त्याला कलाहीन कसें म्हणतां येईल ?

महाराष्ट्रांतील प्रमुख धार्मिक पंथांचा विचार एका प्रकरणांत करण्यांत आला असून वारकरी, रामदासी, नाथ, महानुभाव, दत्त, गोसावी व वीरशैव अशा सात पंथांची थोडक्यांत माहिती त्यांत देण्यांत आली आहे. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध स्थळांचें वर्णन केल्याखेरीज महाराष्ट्राचें चित्र पूर्ण होणार नाहीं या हेतूनें एका प्रकरणांत अमरावती ते हरेश्वरापर्यंतची प्रमुख स्थळें दिलीं आहेत.

महाराष्ट्रीय संस्थानें हीं महाराष्ट्राच्या पराक्रमाचीं, परंपरेचीं व वैभवाचीं स्मारकें असल्यानें बडोदें ग्वाल्हेरादि सुमारे वीस संस्थानांची माहिती एका प्रकरणांत दिली आहे.

शेवटीं महाराष्ट्र भाषा व महाराष्ट्र देश यांच्या स्तुतिपर कांहीं काव्यें देऊन, अडीच कोटी लोकसंख्येच्या महाराष्ट्राचें स्तोत्र किंवा चित्र पुरें

केलें आहे. माझ्या समजुतीप्रमाणें अशा प्रकारचें हें पहिलेंच पुस्तक आहे. महाराष्ट्राबाहेर राहणाऱ्या एका महाराष्ट्रीयानें तयार केलेलें हें चित्र रसिक महाराष्ट्रीयांना आवडेल व संग्राह्य वाटेल अशी आशा आहे.

प्रस्तुत पुस्तक तयार करतांना पुष्कळांचें साहाय्य मी घेतलें आहे. अशांत पुढील ग्रंथ महत्त्वाचे आहेत :—

(१) मोल्सवर्थ कोशाची प्रस्तावना (२) डॉ. भांडारकरकृत अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (३) महाराष्ट्र शब्दकोश प्रस्तावना (४) महाराष्ट्रीय ज्ञानकोश (५) राजवाडेकृत महाराष्ट्राचा वसाहतकाल (६) रावबहादुर सरदेसाई कृत मराठी रियासत (७) वि. ल. भावे कृत महाराष्ट्र सारस्वत (८) प्रो. कृ. पां. कुळकर्णी कृत मराठी भाषा उद्गम व विकास (९) इंपिरियल गॅझेटियर (१०) सेन्सस ऑफ इंडिया रिपोर्ट १९४१ (११) प्रो. दांडेकर कृत मराठी नाट्यसृष्टि—पौराणिक व सामाजिक नाटकें (१२) तोरो कृत सचित्र महाराष्ट्र. ह्या सर्व पूर्वसूरींचा मी ऋणी आहें. त्यांच्यावाचून हें पुस्तक तयारच होऊं शकलें नसतें.

ही प्रस्तावना लिहीत असतांना हिंदुस्थानचें वातावरण स्वातंत्र्यप्राप्तीच्या आनंदानें भरून गेलें आहे. पुस्तकाचें हस्तलिखित जेव्हां छापखान्यांत दिलें तेव्हां आपल्या देशावर ब्रिटिशांचें राज्य होतें, व संस्थानिकांवर रेसीडेंटांची नजर असे. आतां देशाच्या स्वातंत्र्याबरोबर संस्थानिकहि स्वतंत्र झाले असून, पूर्वीचे रेसीडेंट नाहींसे झाले आहेत. तेव्हां पुस्तकांतील एतद्विषयक मजकूर वाचतांना ही सुधारणा लक्षांत घेऊन तो वाचावा.

"श्रीसयाजी साहित्यमाला" ज्यांच्या विद्याप्रेमामुळें व कृपेमुळें निर्माण झाली त्या पुण्यश्लोक श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाडांचें मनोमन कृतज्ञतापूर्वक स्मरण करून ही प्रस्तावना संपवितों.

१५ ऑगस्ट १९४७,
बडोदें.

वि. पां. दांडेकर

# अनुक्रमणिका





—

# महाराष्ट्र

## १

## महाराष्ट्राचा पूर्वेतिहास

महाराष्ट्र शब्दाच्या व्युत्पत्तिसंबंधानें निरनिराळीं मतें आहेत. डॉ. विल्सन[१] यांच्या मतें, "महरट्ट हें महाराष्ट्र या संस्कृत शब्दाचें पाली रूप आहे. हें रूप मल्लराष्ट्र या शब्दाबरोबर विष्णुपुराण वगैरे पुराण-ग्रंथांत आढळतें. संस्कृत पंडित महाराष्ट्र शब्दाची व्युत्पत्ति महा+राष्ट्र=मोठें राष्ट्र अशी करतात...परंतु त्या व्युत्पत्तीस पुरेसा ऐतिहासिक अगर भौगोलिक पुरावा आढळत नाहीं[१]." असें असून ते महारांचें राष्ट्र तें महाराष्ट्र अशी दुसरी व्युत्पत्ति सुचवितात. गांव तेथें महारवाडा, ही म्हणहि स्वमतपुष्ट्यर्थ ते पुढें करितात. ह्या व्युत्पत्तिविरुद्ध एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे कीं, ऐहोळी येथील जैन रवीकीर्तिच्या शिलालेखांत (इ. स. ६३४) महाराष्ट्र हें एक राष्ट्र नसून तीन महाराष्ट्रांचा समुदाय आहे असें स्पष्ट म्हटलें आहे. डॉ. ओप्पर्ट[२] यांनीं दि ओरिजिनल इनहॅबिटंट्स आफ भारतवर्ष (भारत-वर्षाचे आदिवासी) या आपल्या ग्रंथांत "मल्लराष्ट्र म्हणजे महाराष्ट्र होय, मार म्हणजेच मल्ल व मार लोकांनाच म्हार असें म्हणत, म्हाराचे हळुहळू महार झाले, महार लोकांच्या भाग्याला उतरती कळा जसजशी लागत चालली तसतसा त्यांच्या महाराष्ट्र व मल्लराष्ट्र या नांवाशीं असलेल्या संबंधाचा विसर पडून महा+राष्ट्र असा अर्थ करण्यांत येऊ लागला." असें

---

१ मोल्सवर्थ कोशाची प्रस्तावना. २ पृ. २२, १८९३.

मत सुचविलें आहे. महाराष्ट्रांतील फार मोठ्या वर्गाचें कुलदैवत खंडोबा यानें मणिमल्ल दैत्याचा वध केल्यावरून त्यास मल्लारि असें म्हणतात. या गोष्टीवरून तसेंच मलठण, मळगांव, मळखेडें, मळवाण, मळवली इत्यादि गांवाच्या नांवावरून महाराष्ट्रांत पूर्वी मल्लजातीचे लोक राहात असावेत असें कै. राजवाडे यांचें जें मत आहे त्यावरून ही व्युत्पत्ति अगदींच अग्राह्य अशी वाटत नाहीं. डॉ. भांडारकर[१] या बाबतींत असें म्हणतात, "कुडा व बडेसा येथील शिलालेखांत महाभोज असा उल्लेख आहे. ज्याप्रमाणें भोज हे स्वतःला महाभोज म्हणवीत त्याप्रमाणें राष्ट्रिक, रट्टि, रथि, रट्ठ स्वतःला महारट्ठी किंवा महारट्ठ म्हणवीत. त्यांच्या देशाला महारट्ठ म्हणत व त्याचेंच संस्कृत रूप महाराष्ट्र होय." अशोकाच्या शिलालेखांत 'राष्टिकां'चा उल्लेख आहे. त्यावरून ह्या राष्टिकांचें किंवा रट्टांचें जें राष्ट्र तें महारट्ठ किंवा महाराष्ट्र होय हें उघडच दिसतें. कै. वि. का. राजवाडे यांनीं आपल्या 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' या निबंधांत डॉ. भांडारकर यांच्या व्युत्पत्तीला पोषक असेंच मत दिलें आहे. राजारामशास्त्री भागवत यांच्या मतें महारथींचा जो देश तोच महाराष्ट्र होय. महामहोपाध्याय पां. वा. काणे यांच्या मतें मोठें राष्ट्र तें महाराष्ट्र होय. महाराष्ट्रांत पूर्वी मोठें अरण्य होतें. त्याच्या जागीं आर्यांनीं वसाहती स्थापून मोठें राष्ट्र निर्माण केलें, म्हणून त्याला महाराष्ट्र म्हणू लागले. ह्या व्युत्पत्तीला पोषक असा उतारा महानुभावीय ग्रंथांत ( आचार महाभाष्य ) आढळतो. 'महाराष्ट्र म्हणजे महंतराष्ट्र। म्हणून महाराष्ट्र । महंत म्हणजे थोर । असें त्यांत एके ठिकाणीं म्हटलें आहे. वरील सर्व व्युत्पत्तींत रट्टांचा किंवा महारट्टांचा जो देश तो महारठ म्हणजे महाराष्ट्र ही व्युत्पत्ति आणि मोठें राष्ट्र तें महाराष्ट्र ही व्युत्पत्ति ह्या दोन आमच्यामतें अधिक ग्राह्य आहेत. कारण या दोन्हीं व्युत्पत्तींना शिलालेखांचा आधार[२] आहे.

---

१ अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन ( दक्षिण देशाचा प्राचीन इतिहास ).

२ अशोकाचे शिलालेख; ऐहोळी येथील शिलालेख; नाणेघाटांतील शिलालेख.

आतां ह्या महाराष्ट्राची व्याप्ति व मर्यादा या कोठपर्यंत आहेत तें पाहूं या. स्थूल मानानें पाहतां ज्या भागांत मराठी भाषा चालते, बहुसंख्य लोकांकडून बोलली जाते तो महाराष्ट्र होय. या प्रदेशाची व्याप्ति निरनिराळ्या काळीं कमी अधिक असण्याचा संभव आहे. तथापि सामान्यतः या देशाच्या मर्यादा पुढें दिल्याप्रमाणें सांगतां येतील.[१] "मुख्य मराठी भाषा भरतखंडाच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीज अमलाखालीं असलेल्या गोव्याच्या हद्दीपासून सुरू होऊन समुद्र किनाऱ्यानें वर उत्तरेकडे दमण जवळील दमणगंगा या नदीपर्यंत जाते. ही नदी या सह्याद्रीच्या पश्चिमेकडील सखल प्रदेशापुरती मराठी भाषेची उत्तरेकडील सीमा होय. घाटमाथ्यावर मात्र ही सीमा पाणलोटाच्या बाजूबाजूनें कोळी, भिल्ल वगैरे वन्य समाजांतून वर नर्मदेपर्यंत जाते. नर्मदा नदी गुजराती व नेमाडी या भाषांपासून मराठीला विभिन्न करणारी रेषा होय. हीच सीमारेषा पुढें नर्मदेला पूर्वेस व पश्चिमेस स्पर्श करून असलेल्या सातपुडा पर्वताच्या कडेनें गेली आहे. गाविलगडाच्या आसपास ज्या ठिकाणीं सातपुड्याच्या एका दुसऱ्या फाट्यांस सुरवात होते तेथें ही सीमारेषा पूर्वेकडे बैतुल व शिवणीकडे प्रारंभ करून नागपूर व शिवणी यामधील घाटांत संपते. व तेथून नागपूर मध्य कल्पून कांहींशा अर्धवर्तुलाकार रेषेंत ही सीमारेषा थोडी दक्षिणेकडे व थोडी पूर्वेकडे आणि नंतर पश्चिमेकडे वळून लांजी व वैरागड यांना स्पर्श करून जाते. तेथें तिची गोंडी व तेलगू भाषांची गांठ पडते. येथून नंतर ही सीमारेषा चांद्याच्या नजीक जाऊन तेथून पश्चिमेकडे जाण्यास सुरुवात करून पैनगंगेच्या बाजूनें माहूरपर्यंत जाते. ही रेषा मराठी व तेलगू यांमधील विभाजक रेषा होय. माहुरापासून गोदावरीपर्यंत जाऊन नागमोडी मार्गानें ती नैऋत्य दिशेकडे देगलूर, नलदुर्ग, सोलापूर, विजापूर, यांना स्पर्श करून जाते. तेथून ही रेषा कृष्णेपर्यंत जाऊन जवळ जवळ कोल्हापूर पर्यंत जेथें कृष्णा उत्तरेकडे वळसा घेते तेथपर्यंत जाते. कृष्णा ही मराठी व

१ महाराष्ट्र शब्दकोश, खंड तिसरा.

कानडी यांमधील विभाजक रेषा आहे. नंतर ही रेषा नैऋत्य दिशेकडे वळून कोल्हापूर संस्थानचा मुलूख व गोव्याच्या घाटांवरील मुलूख पोटांत घेऊन तेरेखोलच्या खाडीपाशी सुमद्रास मिळते.[१] ”

वर ज्या मर्यादा दिल्या आहेत त्यांत आज परिचित नांवांनीं पाहावयाचें म्हणजे मुख्यत: पुढील प्रदेश येतात. गोकर्ण, गोवें प्रांत, कोंकण, देश, खानदेश, वऱ्हाड, मराठी मध्यप्रांत, व निजामच्या राज्यांतील मराठवाडा यामुख्य भागांत पुढील जिल्हे सामान्यतः मोजले जातात. कारवारचा कांहीं भाग, गोवा, बेळगांवचा कांहीं भाग, रत्नागिरी, कुलाबा, ठाणें, सातारा, सोलापूर, पुणें, अहमदनगर, पूर्व व पश्चिम खानदेश, हे मुंबई इलाख्यांतील जिल्हे; वऱ्हाडांतील बुलढाणा, अकोला, यवतमाळ, उमरावती हे चार जिल्हे; तसेंच मध्यप्रांतांतील वर्धा, नागपूर, चांदा व भंडारा हे जिल्हे आणि बालाघाट व छिंदवाडा या जिल्ह्यांचा भाग व छत्तिसगड, बस्तर संस्थान व रायपूर, द्रुग वगैरेंचा कांहीं भाग आणि यावरील प्रदेशांत अंतर्भुत होणारीं दक्षिणेंतील व इतर संस्थानें, आणि निजामशाहींतील औरंगाबाद, बीड, नांदेड, परभणी हे जिल्हे, उन्मादाबाद व बेदर यांचा कांहीं भाग, या सर्व प्रदेशास आज आपण महाराष्ट्र या नांवानें संबोधितों. परंतु यास महाराष्ट्र हें नांव फार प्राचीन काळापासून दिलेलें आढळत नाहीं. प्राचीनकाळीं या प्रदेशाच्या निरनिराळ्या भागांस निरनिराळीं नावें असलेलीं आढळतात. वऱ्हाड ह्या प्रदेशास पूर्वी विदर्भ म्हणत. खानदेश, अजंठ्याचा पहाड वगैरे भाग अश्मक या नांवानें प्रसिद्ध होता. नाशिकच्या आसपासच्या भागास दण्डकारण्य या नांवानें संबोधिलें जाई. ह्या दक्षिणारण्याच्या दक्षिणेकडील कृष्णेजवळच्या भागास कुंतल व कोंकणास अपरांत असें नांव आढळतें.

बृहदारण्यकोपनिषद, महावंसो, बौधायनस्मृति, महाभारत, रामायण इत्यादि प्राचीन ग्रथात व अशोकाचीं शासनें आणि भाजे, भेडसा, कार्ले,

१ डॉ. विल्सन—मोल्सवर्थ कोशाची प्रस्तावना, १८५७.

नाणेघाट, नाशिक इत्यादि शिलालेखांत विदर्भ, वनवास, महारठ्ठ, दक्षिणापथ, अपरान्त, नाशिक्य, कुंतल, सूपारग (सोपारा), कलियण (कल्याण), पतिठाण (पैठण) इत्यादि महाराष्ट्रांत अन्तर्भुत होणाऱ्या स्थळांचा निर्देश असला तरी महाराष्ट्र या नांवाचा उल्लेख वराहमिहिराच्या काळापर्यंत (इ. स. ४९०) आढळत नाहीं. वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत विदर्भदेश भारतवर्षाच्या मध्यभागाच्या आग्नेय दिशेला आहे असें सांगितलें आहे ( बृहत्संहिता अ. १४·८ ) याच ग्रंथाच्या दहाव्या अध्यायांत महाराष्ट्राचें नांव आलेलें आहे. 'भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः।' (बृ. सं. १०·८) ऐहोळीचा जैन रविकीर्ति यानें लिहिलेला शिलालेख अत्यंत महत्त्वाचा आहे. हा इ. स. ६३४ मध्यें सत्याश्रय पुलकेशीच्या कारकीर्दीत लिहिण्यांत आला असून, त्यांत रविकीर्तीनें असें म्हटलें आहे कीं, महाराष्ट्राचे तीन भाग असून त्यांत ९९००० गांवें आहेत. ( अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां । नवनवति सहस्रग्रामभाजां त्रयाणाम् ) रविकीर्तीच्या वेळीं बदामी शहर महाराष्ट्रांत मोडत होतें. ऐहोळी शिलालेखाच्या वेळीं हिंदुस्थानांत आलेला चिनी प्रवासी ह्युएनत्संग ह्यानें आपल्या प्रवासवृत्तांत महाराष्ट्राबद्दल खालील सीमादर्शक उल्लेख केला आहे. द्रविडदेशाहून उत्तरेस तो एकाकी एका लहान गांवास गेला. तेथून २००० ली (२५०–३०० मैल) प्रवास केल्यावर तो कोंकणपुर (Kung-kin-na-puls) ह्या देशाला गेला. हा देश ५००० ली आहे व त्याच्या राजधानीचा विस्तार ३० ली आहे. कोंकणपुर देश सोडून वायव्येस (इशान्येस ?) प्रवास केल्यावर एक मोठें अरण्य लागलें. त्यांत वन्यपशु व पुष्कळ क्रूर लुटारू होते. कोंकणपुरापासून २४०० ली (३५०–४०० मैल) वाट चालल्यावर तो महाराष्ट्र (Mo-ha-la-cho) देशांत आला. ह्या देशाचा विस्तार ६००० ली होता व त्याची राज्यधानी ३० ली होती.

ह्या महाराष्ट्रांत आर्यांनीं केव्हां वसति केली, या मुद्याकडे आतां आपण वळूं या. दंडकारण्य किंवा महाकान्तार म्हणजे प्रचंड अरण्य असलेल्या

या भागांत केव्हांपासून लोक येऊन राहू लागले हा मुद्दा खरोखरच महत्त्वाचा आहे. पाणिनीच्या काळीं (शकपूर्व ९०० वर्षें) दंडकारण्याची किंवा विंध्य-पर्वताच्या दक्षिणेकडील माहिती आर्यांना नसावी हें उघड आहे. कारण पाणिनीसारख्या अत्यंत चौकस वैयाकरणानें इतर देशांचा आपल्या सूत्रांत उल्लेख केला, तसा दंडकारण्याचा केलेला नाहीं. कात्यायनानें मात्र आपल्या वार्तिकांत महिष्मत् या देशाचा उल्लेख कुमुद्वत्, नदवत्, वेतस्वत् या देशांबरोबर केला आहे. महिष्मत् हा देश महाराष्ट्रांत मोजला जात असून त्याची राजधानि नर्मदाकांठीं असलेलें महिष्मती किंवा महेश्वर हें शहर होतें. कात्यायनाचा काळ शकपूर्व सहाशें वर्षें मानतात. कात्यायनानें नासिक्य उर्फ नाशिक शहराचाहि उल्लेख केला आहे. पतंजलीच्याकाळीं तर सरसहा सर्वांच्या परिचयाचा दक्षिणापथ हा देश झाला होता. महिष्मती, वैदर्भ, कांचिपूर, केरल इत्यादि शहरांचा उल्लेख पतंजलीच्या ग्रंथांत आहे. अर्थात् शकपूर्व सातव्या शतकापासून आर्यांची वसति दंडकारण्यांत हळुहळू होऊं लागून, शकपूर्व तिसऱ्या शतकांत तर रट्टांचीं किंवा राष्ट्रकूटांचीं छोटीं छोटीं राज्यें महाराष्ट्रांत सिद्ध झालीं होतीं. अशोकाच्या शासनांवरून तसेंच नाणेघाटांतल्या शिलालेखांवरून ही गोष्ट सुस्पष्ट आहे. आर्यांपैकींच मानव्य, हैहय, भोज, यादव, नळ, कदंब, मौर्य, सेंद्रक, चालुक्य इत्यादि शेंकडो गोत्रांचे रट्ट दंडकारण्यांत शिरले. त्यांनीं येथें ग्रामकूटपणा म्हणजे पाटिलकी व राष्ट्रकूटपणा म्हणजे देशमुखी व महाराष्ट्रकूटपणा म्हणजे सरदेशमुखी इत्यादि अधिकारांचा स्वीकार करून आपलें वर्चस्व स्थापन केलें. ह्या शेंकडो गोत्रांच्या रट्टांना शहाण्णव कुळींचे मराठे म्हणण्याची चाल आहे. आजच्या माने, शिंदे, जाधव, कदम इत्यादि आडनांत पूर्वींच्या मानव्य, सेंद्रक, यादव, कदंब इत्यादि गोत्रांचा ठसा स्पष्ट दिसतो. आर्य दंडकारण्यांत येण्यापूर्वीं येथें मूतिब, पुलिंद, शबर, भिल्ल, कातकरी, ठाकूर, गोंड, खोंड, कोळी व नाग इत्यादि अनार्य लोक राहत असावेत असें वाटतें. कदाचित् हे लोक, अमेरिकेंत नीग्रो युरोपियनांच्या मागाहून आले

तसे, आर्यांच्या मागाहून किंवा बरोबरीनें आले असावेत असेंहि एकमत आहे.[१] मराठींत व तत्पूर्वीच्या महाराष्ट्रींत अगदीं देशी, ज्यांचा संस्कृतशीं कांहींहि संबंध नाहीं असे, शब्द आहेत त्यांवरून तसेच आर्यांच्या संस्कृत भाषेला महाराष्ट्रीसारख्या अपभ्रंश भाषेचें जें स्वरूप दंडकारण्यांत आलें त्यावरून, या प्रदेशांत अनार्यांची पुष्कळ वसति असावी हें उघड होतें. सांप्रत महाराष्ट्रांत वंशशास्त्राच्या दृष्टीने पाहतां पश्चिमेकडील भागांत सिदियन व द्रविडियन अशा मिश्रवंशाचे लोक मुख्यतः रहातात, व पूर्वेकडील भागांत मोंगलद्रविडियन वंशाचे लोक वसति करून आहेत. पश्चिमेकडील भागांत ब्राम्हण, प्रभु, पाठारे प्रभु, मराठा, कुणबी, महार, धनगर, भिल्ल, लिंगायत या जाती मुख्य असून पूर्वेकडील भागांत ब्राम्हण, चांभार, भिल्ल, गोंड, कुणबी, कोळी या जाती प्रमुख आहेत. या शिवाय वाणी, माळी, मांग, कुंभार, सुतार, आगरी, सोनार, न्हावी, बेरड, भांडारी, वारळी, शिंपी, तेली, लोहार, वणजारी, अहिर याहि जाती महाराष्ट्रांत आढळतात. मुसलमानांची लोकसंख्याहि महाराष्ट्रांत आहे. पण तिचें प्रमाण फार थोडें आहे. सर्वांत जास्त लोकसंख्या मराठा यांची असून कुणबी यांची लोकसंख्या त्यांच्या खालोखाल आहे. गुजरात प्रांताच्या मानानें महाराष्ट्रांत जातींचा बुजबुजाट नाहीं हें सुदैव म्हणावयाचें. गुजरातमध्यें एकट्या ब्राह्मणाच्या एकशे सत्तर पोटजाती आहेत ! त्या मानानें महाराष्ट्रांत अवघ्या तेराच आहेत.

प्राचीनकाळीं अगस्ति ऋषीनें ज्या मार्गानें विंध्यपर्वत ओलांडून आर्यांच्या वसाहतीची मुहूर्तमेढ दंडकारण्यात रोविली, त्याच मार्गानें दाशरथी रामानें जाऊन हें वसाहतकर्म पुढें चालविलें. पूर्वसूरींच्या याच मार्गाचा अवलंब करून शकपूर्व सातव्या–आठव्या शतकांत आर्यांनीं दंडकारण्यांत घुसण्याचा जोराचा प्रयत्न केला. ह्या रट्ट आर्यांनीं इतकें यशस्वी वसाहतकार्य केलें कीं त्यांच्याच दंडकारण्याला पुढें महाराष्ट्र किंवा महारट्ठ म्हणू लागले.

---

१ के. वि. का. राजवाडे, महाराष्ट्राचा वसाहतकाल.

# २

# महाराष्ट्रांतील राजकीय स्थित्यंतरें

सम्राट अशोकाच्या शिलाशासनांवरून महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या राजघराण्यात मौर्य घराण्याचा प्रथम उल्लेख केला पाहिजे. हें घराणें खि. पूर्व ३२० ते खि. पूर्व. १८३ पर्यंत राजसत्ता उपभोगीत होतें. महाराष्ट्राच्या सर्व भागावर या घराण्याची सत्ता नसावी. कारण अशोकाच्या शिलालेखांत आपल्या राज्याच्या दक्षिणेंकडे राष्टिक ( राष्ट्रिक ) व पेटेणिक ( पैठणक ) यांचीं राज्यें असल्याचा उल्लेख आहे. तरी पण विदर्भ व शूर्पारक ( सोपारा ) या भागांत मौर्यांची सत्ता होती ही गोष्ट निर्विवाद आहे. मौर्य घराण्यांतील शेवटचा राजा बृहद्रथ यांस त्याचा सेनापति शुंगवंशीय पुष्यमित्र किंवा पुष्पमित्र यानें ठार करून शुंगवंशाची स्थापना केली. या वंशानें खि. पू. १८३ पासून खि. पू. ७३ वर्षापर्यंत महाराष्ट्रावर राज्य केलें. यानंतर खि. पू. शके ७३ पासुन ते इ. स. २१८ पर्यंत शातवाहन ( शालिवाहन ) किंवा आंध्रभृत्य घराण्याकडे राजसत्ता आली. या आंध्रभृत्य घराण्यांतील सिमुक ( सिंधुक ), कृष्ण, शातकर्णी, गौतमीपुत्र, पुलुमायी, यज्ञश्री व मढरिपुत्र इत्यादि राजांचा नाशिक व कान्हेरी येथील शिलालेखांत उल्लेख आहे. गोतमीपुत्र शातकर्णी व वासिष्टीपुत्र पुलुमायी ह्या पितापुत्रांनीं एकाचवेळीं अनुक्रमें धनकटक ( गन्तुर जिल्हा ) व पैठण या भागांत राज्य करून शक-यवन-पल्हवांचा नाश केला; व आपल्या राज्याचा विस्तार उत्तरेस सुराष्ट्रापासून दक्षिणेस धर्णिकोट पर्यंत केला. हे पितापुत्र अत्यंत पराक्रमी उदार व दानशूर होते असें नाशिक येथील शिलालेखांवरून स्पष्ट होतें. आंध्रभृत्यांच्या अमदानींत सुमारें पन्नास वर्षें शकांचें

आक्रमण यशस्वी ठरून, महाराष्ट्राच्या कांहीं भागांत त्यांचें राज्य होतें. क्षहरात नहपान व त्याचा जांवई उशवदात ह्या शक राजांचा उल्लेख नाशिक व जुन्नर येथील शिलालेखांत आहे- बुद्ध भिक्षुकरितां उशवदातानें विहार बांधविल्याचा उल्लेख नाशिक येथील लेण्यांत आहे. वायुपुराण, विष्णुपुराण, मत्स्यपुराण इत्यादि पुराणांत आंध्रभृत्य राजाची जी वंशावळ दिली आहे ती व शिलालेखांत शातवाहनांची जी यादि आढळते ती हीं दोन्हीं एकच होत. आंध्रभृत्यांच्या नंतरच्या तीन शतकाचा इतिहास बराचसा अज्ञात आहे. आंध्रभृत्यांच्या पडत्या काळांत महाराष्ट्रांतील मूळचीं रट्ठांची किंवा रट्टकुटांचीं घराणीं पुनः वर डोकीं करूं लागलीं असतील. खानदेशाच्या भागांत आभीरांचें व त्याच्याखालीं रट्टकुट किंवा राष्ट्रकुटांचें राज्य ह्या काळांत असावें. यांपैकींच इंद्र राष्ट्रकूटाचा जयसिंह चालुक्यानें पराभव करून, चालुक्य राजवंशाची स्थापना महाराष्ट्रांत केली. जयसिंह चालुक्यानंतर रणराग व त्यानंतर त्याचा पुत्र पुलकेशी पहिला हा गादीवर आला. हा मोठा पराक्रमी राजा होऊन गेला. यानें बदामी (वातापीपूर) येथें राजधानि स्थापन केली व अश्वमेध यज्ञ केला. मंगलीश चालुक्यान त्रिपुरीच्या चेदीवंशीय कलचुरीचा पराभव केला. बदामी येथील लेण्यांत मंगलीशानें विष्णुपूजा सुरूं केल्याचा निर्देश आहे. दुसरा पुलकेशी हा तर मोठाच पराक्रमी होता. यानें मौर्य, लाट, मालव, गुर्जर इत्यादिकांचा पराभव केला. कोसल व कलिंग येथील राजे याच्यापुढें कांपत असत. कावेरी ओलांडून चोल पाड्य व केरळ राजांचाहि त्यानें निःपात केला. इतकेंच नाहीं तर उत्तरेकडील हर्षवर्धन राजाच्या सैन्याचाहि त्यानें पराभव करून परमेश्वर ही पदवी धारण केली. त्याचें पूर्ण नांव सत्याश्रय श्री पृथ्वीवल्लभ पुलकेशी महाराज असें होतें. अजिंठा येथील एका चित्रांत इराणी वकील याच पुलकेशीला खलिते देत आहे असें चित्र आहे. आपल्या राज्याच्या रक्षणार्थ नर्मदेवर यानें खडें सैन्य ठेवलेलें असें. याच्याच राज्यांत इ. स. ६३९ च्या सुमारास चिनी यात्रिक ह्युयुएन्त्संग हा चीनहून फिरत फिरत

महाराष्ट्रांत आला होता. चालुक्य घराणें इ. स. ५१३ पासून ७५३ पर्यंत चालू होतें. याच राजवटींत गुणाढ्याचा बृहत्कथानामक पैशाची भाषेंतील ग्रंथ व हालाची महाराष्ट्रांमधील सप्तशती हे ग्रंथ लोकप्रिय झाले. चालुक्य वंशांतील शेवटचा राजा दुसरा कीर्तिवर्मा याचा पराजय दन्तिदुर्ग या राष्ट्रकूटानें करून, पुनश्च राष्ट्रकूट घराण्याची राजसत्ता प्रस्थापित केली. हें घराणें इ. स. ७५३ पासून इ. स ९७२ पर्यंत सत्ता उपभोगीत होतें. या काळांत दंतिदुर्ग, कृष्णराज, गोविंद (दुसरा ) ध्रुव, गोविंद (तिसरा) अमोघवर्ष, कृष्ण (दुसरा), जगत्तुंग (तिसरा) अमोघवर्ष (दुसरा), गोविंद (चौथा), अमोघवर्ष (तिसरा) खोटिक व कक्काल असें अनुक्रमानें वीस राजे होऊन गेले.

राष्ट्रकूट घराण्यांतील प्रथमचे कांहीं राजे अत्यंत पराक्रमी झाले. दन्तिदुर्गानें चालुक्यांचा पराभव केल्यानंतर त्यांचा पूर्ण निःपात कृष्णराज राष्ट्राकूटानें केला. ह्याच कृष्णराजानें वेरूळ येथें आजहि दृष्टीस पडणारें प्रचंड कैलास लेणें तयार करविलें. तिसऱ्या गोविंद राष्ट्रकूटानें आपल्या राज्याचा विस्तार माळव्यापासून कांचीपूरपर्यंत केला. ह्या राष्ट्रकूटांच्या कारकीर्दींतच बुद्धविहार मागें पडून शिव व विष्णु यांच्याकरितां भव्य देऊळें जागोजागीं उभारलीं गेलीं. बुद्धधर्माचा या काळांत शेवट झाला तरी जैनधर्मानें आपला टिकाव धरला. विद्या व कला ह्यांना उदार आश्रय याच काळांत मिळाला. हलायुध कवीनें रचलेल्या कविरहस्य नामक काव्याचा नायक कृष्ण राष्ट्रकूट हा आहे. या गोष्टीवरूनहि राष्ट्रकूट राजे विद्या व कला यांचे कसे आश्रयदाते होते हें समजतें. ह्या राष्ट्रकूटांची राजधानि मान्यखेट किंवा मालखेड येथें होती. राष्ट्रकूट घराण्यांतील शेवटचा राजा कक्काल यांस चालुक्य वंशीय तैलपानें इ. स. ९७२ च्या सुमारास जिंकून पुनः चालुक्यांचें साम्राज्य स्थापन केलें. हे उत्तर चालुक्य व पूर्वीचे चालुक्य एक नव्हेत असें कै. डॉ. भांडारकर यांचें मत आहे. या घराण्यांतील पराक्रमी राजांनीं स्वतःला त्रैलोक्यमल्ल, त्रिभुवनमल्ल, भुवनैकमल्ल अशा उपाधींनीं भूषवून

घेतलें असलें, तर पूर्वीच्या चालुक्यांनीं पृथ्वीवल्लभ, सत्याश्रय इत्यादि पदव्या धारण केल्या ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. तैलपानंतर सत्याश्रय, विक्रमादित्य (पहिला), जयसिंह, सोमेश्वर (पहिला), सोमेश्वर (दुसरा), विक्रमादित्य (दुसरा), सोमेश्वर (तिसरा), सोमेश्वर (चौथा) इत्यादि अकरा राजे इ. स. ११८९ पर्यंतच्या काळांत झाले. या राजांत दुसऱ्या विक्रमादित्याची कारकीर्द बरीच गाजली. त्यानें इ. स. १०७६ ते इ. स. ११२६ पर्यंत पन्नास वर्षे दणदणीत राज्य केलें. सुप्रसिद्ध काश्मिरी पंडित बिल्हण यानें याच राजाचें काव्यमय चरित्र रचिलें आहे. विक्रमादित्यानें बिल्हणाला विद्यापति ही गौरवाची पदवी देऊन भूषविलें. याज्ञवल्क्यस्मृतिवरील प्रसिद्ध मिताक्षरा ह्या टीकेचा कर्ता पंडित विज्ञानेश्वर विक्रमादित्याच्या राजवटींतच होऊन गेला. चालुक्यांची राजधानि बेदरजवळील कल्याण किंवा कल्याणी ही होती. शेवटचे चालुक्य राजे दुर्बल बनल्यामुळें त्यांच्या मांडलिक राजांनीं त्यांच्याविरुद्ध बंड पुकारण्यास सुरुवात केली. अशा मांडलिकांपैकींच कलचुरी वंशाचे राजे होते. यांचा मूळपुरुष जोगमाचा पुत्र पेरमादि हा तिसऱ्या सोमेश्वराचा मांडलिक होता. यानंतरचा विज्जल हा जगदेकमल्लाचा मांडलिक व पुढें दुसऱ्या तैलपाचा सेनापति होता. हा इ. स ११६१ मध्यें स्वतंत्र होऊन कल्याणि येथे यानें आपली राजधानि केली. याची स्त्री पद्मावती हिचा भाऊ प्रसिद्ध लिंगायत बसव यानें याचा खून केला. यानंतर सोमेश्वर चौथा हा गादीवर आला व त्यानंतर संकम, आहवमल्ल व सिंघण या त्याच्या तिघा भावांपासून होयसळ बल्लाळ यानें हें राज्य घेतलें (इ. स. ११८३-८४). अखेरीस यादववंशीय पांचव्या भिल्लमानें इ. स. ११८९ च्या सुमारास यादवांचें साम्राज्य स्थापिलें. यादववंश हा मूळचा उत्तरेंत मथुरेस राज्य करीत होता. तो कृष्णाच्या काळीं द्वारकेचा राजवंश झाला. याच वंशांतील दृढप्रहार यानें प्रथम दक्षिणेंत चंद्रादित्यपूर किंवा चांदवड येथें आपलें राज्य इ. स. ७५४ च्या सुमारास स्थापिलें. पुढें या वंशांतील बलाढ्य राजा भिल्लम यानें चालुक्यांचा बीमोड करून देवगिरी (आधुनिक

दौलताबाद) येथें राजधानि नेली. भिल्लमानंतर त्याचा मुलगा जैत्रपाल हा गादीवर बसला व त्याच्यानंतर त्याचा मुलगा सिंघण यानें सर्व दक्षिणभर यादवांची सत्ता स्थापून गुजरातहि आपल्या अंमलाखालीं आणला. याच सिंघणाचा सुप्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्यांचा नातू चांगदेव हा ज्योतिषी होता. यानेंच कोल्हापूरच्या शिलाहार राजा दुसरा भोज याचा पराभव करून (शके १०८९) त्याचें राज्य देवगिरीस जोडलें. सिंघणानंतर त्याचे नातू कृष्ण व महादेव यांनीं अनुक्रमें इ. स. १२४७ ते १२६० व १२६० ते १२७१ राज्य केलें. महादेवानंतर त्याचा पुतण्या रामचंद्र किंवा रामदेव हा इ. स. १२७१ मध्यें गादीवर बसला. याच महादेव व रामदेव राजांचा प्रधान हेमाद्रि किंवा हेमाडपंत नांवाचा विद्वान ब्राह्मण होऊन गेला. यानेंच मराठींत मोडी लिपी अस्तित्वांत आणिली. यानें चतुर्वर्गचिंतामणि नांवाचा चारहि पुरुषार्थांचें विवेचन करणारा ग्रंथ लिहिला. रामदेव राजांच्याच कारकीर्दीत श्रीज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी नामक ग्रंथ रचिला. सुरुवातीच्या महानुभावीय वाङ्मयाची रचना याच काळांत झाली. वैद्यकीय ग्रंथाचा कर्ता बोप्पदेव पंडित याच राजवटींत होऊन गेला. ज्यावेळीं महाराष्ट्रांत देशावर भागांत राष्ट्रकूट–चालुक्य–यादव यांचीं क्रमानें राज्यें चालू होतीं त्यावेळीं ठाणें ते कोल्हापूर पर्यंतच्या समुद्र व सह्याद्रि लगतच्या भागांत इ. स. ८०० ते १२०० पर्यंत शिलाहार राजांचें राज्य होते. हें राज्य पुढें सिंघणानें आपल्या राज्यास जोडलें.

महाराष्ट्रांतील यादव राजांच्या साम्राज्याचा शेवट अल्लाउद्दीन खिलजीचा एक सरदार मलिक-इ-काफूर यानें केला. ज्ञानेश्वरींत ज्या रामदेवराव यादवाचा गौरवपूर्वक उल्लेख करण्यांत आला आहे, त्याच्यावर अलाउद्दिन खिलजीनें स्वारी करून त्याला आपलें मांडलिकत्व कबूल करायला लाविलें होतें. रामदेवरावानें कांहीं दिवस मांडलिकत्व मान्य करून पुढें दिल्लीस खंडणी देण्याचें बंद केलें. तेव्हां मलिक-इ-काफूरनें त्याच्यावर चढाई करून त्यांस पुनः दिल्लीच्या बादशहाचें वर्चस्व कबूल करायला

लाविलें. हें त्यानें आमरण कबूल केलें. पुढें रामदेवराव वारल्यावर त्याचा मुलगा शंकरदेव यादव हा गादीवर बसला. त्यानें दिल्लीचें वर्चस्व नाकारल्यानें मलिक-इ-काफूरनें पुनः देवगिरीवर स्वारी करून या खेपेस (इ. स. १३१२ शंकरदेव यादवाला ठार मारलें. अशा तऱ्हेनें मराठ्यांची राजधानि देवगिरी ही मुसलमानांच्या ताब्यांत गेली. अलाउद्दिनच्या मृत्यूनंतर दिल्लीस जो गोंधळ माजला त्याचा फायदा घेऊन रामदेवरावाचा जांवई हरपाळ यानें स्वातंत्र्याचें निशाण पुन: उभारिलें पण दुर्दैवानें अलाउद्दिनचा मुलगा मुबारक (जो आतां बादशहा बनला होता) यानें दाक्षिणेंत स्वारी करून हरपाळ यांस कैद केलें व त्याचा मोठ्या क्रूरपणानें अंग सोलून वध केला.

इ. स. १३१२ पासून पुढें तीनशे सव्वातीनशें वर्षेपर्यंत महाराष्ट्रांत मुसलमानांचेंच राज्य चालू होतें. खिलजी घराण्यांनतर दिल्लीच्या गादीवर तघलख घराणें आलें. महंमद तघलखानें साम्राज्यविस्तार बराच केला. पण त्याला तो सांभाळता आला नाहीं. त्यामुळें मुलतान-बंगाल-वरंगळ बेदर-देवगिरी-गुजरात अशी जिकडे तिकडे बंडें उत्पन्न झालीं. अशा बंडांतूनच हसन गंगू ब्राह्मणी (कोणी यांस झफिरखान ऊर्फ अलाउद्दिन हुसेन कांगो म्हणतात.) यानें महाराष्ट्रांत इ. स. १३४७ मध्यें ब्राम्हणी ऊर्फ बहामनी राज्याची स्थापना केली. हसन हा मुळचा गंगू नामक एका ब्राम्हणाच्या पदरीं गुलाम होता. पुढें त्या ब्राम्हणानें त्यांस मुक्त केलें. तेव्हां हसननें आपल्या मालकाच्या उदारपणाची आठवण म्हणून त्याचें नांव आपल्या नांवास जोडलें असें म्हणतात. भीमानदीजवळचें कलबुर्गा - शहर ही हसनची राजधानि होती. हसनच्या राज्याभोंवतीं हिंदूंचीं राज्यें होतीं. त्यांच्याशीं त्याला कधीं सौम्यतेनें तर कधीं कडकपणे वागावें लागे. त्याच्या-पश्चात् कलबुर्ग्याच्या गादीवर एक लहान मुलगा आल्यानें, राज्यकारभार महंमद गवान नांवाच्या इराणी सरदाराकडे आला. महंमद गवानचा राज्यकारभार बराचसा शिस्तीचा व शांततेचा झाला. तरी देखील त्याला

शत्रु उत्पन्न होऊन इ. स. १४८१ मध्यें त्याचा खून झाला. यापुढें बहामनी राज्यांत फूट पडून त्याचें पांच तुकडे झाले.

तीं पांच राज्यें येणेंप्रमाणें होत. पहिलें राज्य वऱ्हाडचे (इ.स. १४८४) त्याचा संस्थापक इमादशहा. हा मूळचा ब्राह्मण होता. वऱ्हाडचें राज्य इ. स. १५७२ मध्यें अहमदनगरच्या ताब्यांत गेलें. पुढें तें अहमदनगरच्या राजानें दिल्लीकरांच्या ताब्यांत दिलें.

दुसरें राज्य विजापूरचें. त्याचा संस्थापक यूसफ अदिलशहा होता. हा महंमद गवानच्या पदरीं सरदार म्हणून होता. यानें १४८९ मध्यें आदिलशाहीची स्थापना केली. याच्या राज्यांत हिंदूंचा छळ बंद झाला व मराठी ही दरबारची भाषा झाली. शिवाजी महाराजांनीं मराठी राज्याची स्थापना करीत असतां विजापूरकरांचा अनेक मार्गांनीं मोड केला. इ. स. १६८६ मध्यें औरंगजेबानें हें राज्य दिल्लीच्या राज्यास जोडलें.

तिसरें राज्य अहमदनगरचें. त्याचा संस्थापक निजामशहा हा मूळचा वऱ्हाडांतील पाथर्डी गांवचा कुळकर्णी ब्राह्मण होता. त्याचा मुलगा अहमद यानें अहमदनगर वसवून तेथें आपली राजधानि नेली. दिल्लीचे मोंगल बादशहांची वक्र नजर अहमदनगरवर नेहमीं राही. चांदबीबी, मलिकअंबर व शहाजी यांनीं वेळोवेळीं निजामशाही वाचविण्याचे प्रयत्न केले. पण ते फसून अहमदनगरचें राज्य इ. स. १६३७ मध्यें मोंगलांच्या राज्यास जोडलें गेलें.

चवथें राज्य गोवळकोंड्याचें. कुतुबशाहानें याची स्थापना इ. स. १५१२मध्यें केली. कुतुबवंशांतील राजे इतर मुसलमान राजांप्रमाणें बहामनी राज्याच्या इतर भागांशीं भांडत नसत. पूर्वेकडील हिंदूंचीं शहरें घेऊन त्यांनीं आपला राज्यविस्तार केला. औरंगजेबानें हें राज्य इ. स. १६८८ मध्यें जिंकून हें घराणें नाहींसें केलें.

पांचवें राज्य बेदरचें. मूळ बहामनी वंशांतील राजे याच्यावर इ. स. १५२९ पर्यंत राज्य करीत होते. पुढें बेदरचा प्रधान बरीदशहा व त्याचे

वंशज यांनीं विजापूरवर स्वारी करण्याचें धोरण ठेविल्यानें विजापूर दरबारनें तें इ. स. १६०९ मध्यें जिंकून घेतलें.

मुसलमानांची सत्ता महाराष्ट्रांत तीनशे वर्षें टिकल्यानंतर तिला हळुहळू उतरती कळा लागून, तिच्या जागीं मराठ्यांची सत्ता हळुहळू पण निश्चितपणें आपलें आसन जमवू लागली. शिवाजी महाराजांचे वडिल शहाजीराजे भोंसले हे प्रथम अहमदनगर व मागाहून विजापूर अशा दोन मुसलमान संस्थानांत मातब्बर सरदार म्हणून गाजले त्यांच्याकडे पुणें व सुपें या दोन प्रांताची जहागीर होती. या जहागिरीवर देखरेख ठेवण्याची कामगिरी त्यांनीं दादाजी कोंडदेव मळठणकर ह्या कर्तबगार ब्राह्मणाकडे सोंपविली होती. शिवाजीनें राजकारणाचे पहिले धडे दादाजी कोंडदेव यांजकडून घेतले. आपल्या जहागिरीच्या आसपासच्या हळुहळू निष्प्रभ होणाऱ्या यावनी सत्तेकडे पाहून शिवाजीच्या मनांत राज्यस्थापनेची कल्पना येऊन, त्यानें आपल्या मावळ्यांच्या मदतीनें इ. स. १६४५ ते १६४८ या तीन वर्षांत राजगड, तोरणा, पुरंदर, लोहगड, राजमाची हे विजापूरच्या ताब्यांतील किल्ले हस्तगत केले. विजापूरकरांनीं शहाजीला कैद करून शिवाजीला भीति दाखविण्याचा व्यर्थ प्रयत्न केला. शिवाजीनें दिल्लीच्या बादशहाशीं सूत जमवून व विजापूरकरांना त्यांचा कोंडाणा परत देऊन शहाजीची सुटका करवून घेतली. या पुढच्या काळांत शिवाजीनें जावळी प्रांत, कोल्हापूर प्रांत, मुधोळ, सावंतवाडी इत्यादि सह्याद्रि-लगतचा भाग जिंकून व विजापूरकरांनीं पाठविलेल्या अफझुलखान, सिद्दी जोहार इत्यादि बलाढ्य सरदारांना नामोहरम करून विजापूर दरबारकडून आपल्या राज्याला मान्यता मिळविली. ह्यावेळीं कल्याणपासून गोंव्यापर्यंतची कोंकणपट्टी आणि भीमेपासून वारणेपर्यंतचा घाटमाथा असा १५० मैल लांबीचा आणि १०० मैल रुंदीचा मुलुख शिवाजीच्या ताब्यांत होता. इ. स. १६६४ मध्यें शिवाजीनें सुरतेवर स्वारी-करून त्या शहराची खंडणी वसूल केली, व याच वर्षी शहाजीराजे वारल्यानें 'राजे' हें पद स्वतःकडे घेतलें, व आपल्या नांवाचें नाणें पाडलें.

हा सर्व प्रकार पाहून दिल्लीचा बादशहा औरंगजेब यानें शिवाजीस चिरडून टाकण्याच्या हेतूनें राजा जयसिंग व दिलेरखान यांस अफाट सैन्य देऊन शिवाजीवर स्वारी करण्याकरितां पाठवून दिलें. समयाकडे पाहून शिवाजीनें यावेळीं औरंगजेबाशीं तह केला. पण मागाहून त्यानें पुनः मोंगलांना दिलेले किल्ले जिंकून घेऊन व चांदवड व साल्हेर ह्या दोन ठिकाणीं मोंगल सैन्याचा पराभव करून त्यांच्याकडून आपल्या राज्याला कायमची मान्यता मिळविली. इ. स. १६७४ मध्यें काशीचे ब्राह्मण बोलावून रायगडावर हिंदुधर्मपद्धतिप्रमाणें शिवाजीनें आपणावर राज्याभिषेक करवून घेतला व याच प्रसंगीं 'छत्रपति' असा नवा किताब धारण करून नवा शक त्यानें सुरू केला.

इ. स. १६८० मध्यें शिवाजी महाराज कालवश झाल्यावर इ. स. १८१८ पर्यंत महाराष्ट्रांत मराठ्यांचीच सत्ता होती. शिवाजीच्या नंतर त्याचा वडील मुलगा संभाजी हा गादीवर आला. त्याचा औरंगजेबानें १६८९ मध्यें क्रूरपणें वध केल्यानंतर, त्याचा भाऊ राजाराम यानें अत्यंत कठिण परिस्थितींत मराठ्यांचें राज्य आपल्या मृत्यूपर्यंत (इ स. १७००) टिकविलें. राजारामानंतर त्याचा पुत्र शिवाजी हा साताऱ्याच्या गादीवर राज्य करूं लागला. इतक्यांत इ. स. १७०७ मध्यें संभाजीचा मुलगा शाहू व त्याची आई येसूबाई मोंगलांच्या कैदेंतून सुटून आल्यावर मराठी राज्यांत दुही उत्पन्न होऊन त्यापायीं कोल्हापूर व सातारा अशीं दोन राज्यें झालीं. त्यांपैकीं कोल्हापूर येथें राजारामाचा मुलगा शिवाजी याचें राज्य व सातारा येथें संभाजीचा मुलगा शाहू याचें राज्य सुरू झालें. शाहूच्या पक्षाकडे प्रथमपासून बरेच मराठे सरदार होते. शाहूला बाळाजी विश्वनाथ भट नांवाच्या कर्तबगार ब्राह्मण सरदाराची जोड मिळाल्यानें, छत्रपति म्हणून पुढच्या काळांत त्याचेंच नांव सर्वतोमुखीं झालें. इ. स. १७१५ च्या सुमारास शाहूनें बाळाजी विश्वनाथ यांस मुख्य पेशवा करून राज्यकारभार त्याच्याकडे सोपविला. ह्या पेशव्यांच्या कारकीर्दींत मराठी राज्य हें नुसतें

राज्य न राहतां त्याचें रूपांतर साम्राज्यांत झालें. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव बाळाजी, नानासाहेब, थोरले माधवराव इत्यादि रणझुंजार पेशव्यांच्या काळांत मराठयांची सत्ता थेट अटकेपर्यंत जाऊन पोंचली. शिंदे, होळकर, भोंसले गायकवाड इत्यादि छत्रपतींच्या सरदारांनीं मराठयांचा भगवा झेंडा उत्तर हिंदुस्थानांतहि फडकविण्याच्या कामीं पेशव्यांना बरीच मदत केली. पुढे पेशव्यांच्या घराण्यांत गृहकलह माजल्यानें, तसेंच मराठे सरदारांत आपापसांत दुही सुरू झाल्यानें, वाढत्या इंग्रजी सत्तेचा आश्रय त्यांनीं घ्यायला सुरुवात केली आणि त्यापायीं इ. स. १८१८ मध्यें दुसऱ्या बाजीरावानें स्वराज्याचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडून तो ब्रह्मावर्तास चालता झाला.

या नंतरच्या आजपर्यंतच्या काळांत महाराष्ट्रांत इतर हिंदुस्थानांतल्या प्रमाणेंच—इंग्रजांचें राज्य सुरू होतें. पूर्वींच्या मराठी राज्याच्या सरदारांपैकीं शिंदे, होळकर, गायकवाड, भोंसले, घोरपडे, पटवर्धन पंतप्रतिनिधि इत्यादिकांनीं इंग्रजांशीं तह केल्यानें त्यांचीं राज्यें इंग्रजांच्या सार्वभौमत्वाखालीं टिकाव धरून राहिलीं असून या नव्या युगांत सार्वत्रिक प्रगति करीत आहेत. स्वतंत्रपणें राज्यविस्तार यांपैकीं कोणालाहि करतां येत नसल्यामुळें, सामान्यतः ब्रिटिशपार्लमेंटचेंच महाराष्ट्रावर व पर्यायानें हिंदुस्थानावर साम्राज्य सुरू होतें असें म्हटलें पाहिजे.

आतां १५ ऑगस्ट १९४७ पासून हिंदुस्थानाला वसाहतीचा दर्जा प्राप्त झाला असून, एक प्रकारचें स्वातंत्र्य मिळालें आहे. हिंदुस्थान व पाकिस्तान असे दोन भाग ह्या देशाचें करण्यांत आले असून, यापुढें इंग्लंडचा राजा हा हिंदुस्थान किंवा पाकिस्तानचा बादशहा न राहतां, साधा राजाच राहील. अर्थात् महाराष्ट्र हा प्रांत स्वतंत्रपणें परंतु हिंदुस्थानच्या संघराज्यांत सामील होऊन राहिला आहे असें ठरतें.

---

# ३

## मराठी भाषेची उत्पत्ति

महाराष्ट्रांत रूढ असलेल्या मराठी भाषेच्या उत्पत्तिसंबंधीं विद्वानांमध्यें बराच मतभेद आहे. कांहीं लोक संस्कृत भाषेला मराठीची जननि मानतात, तर कांहीं पालीभाषेला हा मान देतात. कांहींकांच्या मतें महाराष्ट्री नांवाची प्राकृत भाषा ही मराठीची जननि होय तर उलट कांहींकांना वेदाच्याहि पूर्वी लोकांत चालू असलेल्या प्राचीन प्राकृत भाषेपासून मराठी निघाली असें वाटतें. अशा तऱ्हेनें मराठी भाषा ही निश्चित्पणें अमुक एका भाषेपासून निघाली असें सांगतां येत नाहीं. गुजराती, बंगाली, हिंदी ह्या भाषांचें मूळ निश्चित् रीतीनें सांगतां येतें. परंतु मराठी भाषेची तशी स्थिति नाहीं. ह्याचें कारण मराठी भाषेच्या व्याकरणाच्या निरनिराळ्या बाबतींत संस्कृत, पाली, पैशाची, महाराष्ट्री, अपभ्रंश इत्यादि भाषांचे अवशेष व त्यांचीं कांहीं चिन्हें आढळून येतात हें होय. मराठी भाषेंत जे शेंकडो तत्सम संस्कृत शब्द आहेत, त्यांच्यावरून संस्कृतला मराठीची जननि ठरवायला जावें तों तिण, पाऊस, छकडा, गूळ, अस्वल, रूख इत्यादि अनेक पाली शब्द जे मराठींत ठाण देऊन बसले आहेत ते आपणाला तसें करण्यापासून परावृत्त करतात. पैशाची भाषेप्रमाणें 'ण' व 'न' ह्यासंबंधींचे बदल मराठींत आढळतात. ऊन, तहान, कान, रान, जानवें इत्यादि शब्द पैशाची भाषेंतून मराठींत आले आहेत. मागधी प्राकृतांत 'र'कार व 'स'कार या दोहोंबद्दल 'ल'कार व 'श'कार हे वर्ण अनुक्रमें येतात; तसेंच संस्कृत 'स्थ' अगर 'र्थ' ह्या बद्दल मागधींत 'स्त' होतो. मराठींतहि हा प्रकार आढळतो. उदाहरणार्थ मिसळ (मिश्र), घोळतो (घूर्णते), जोशी (जोइसी), केशर (केसर). अशाच रीतीनें

अर्धमागधीच्याहि कांहीं लकबा (दीर्घस्वर ऱ्हस्व करणें इत्यादि) मराठीनें स्वीकारल्या आहेत. पण ह्या सर्व भाषांपेक्षां महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन भाषांचें ऋण मराठीवर सर्वांत अधिक आहे. अकारान्त नपुंसकलिंगी नामें जशीं महाराष्ट्रींत लिंग बदलत नाहींत, तशींच मराठींतहि बदलत नाहींत. मराठींतील द्वितीयेचा 'स' प्रत्यय महाराष्ट्रींतील षष्ठी व चतुर्थीच्या 'स्स' प्रत्ययापासून आला आहे. (उदा. हत्तीस <हत्तिस्स; आगीस <अग्गिस्स <अग्नेः) नामाला लागणारे विभक्तींचे प्रत्यय मराठीनें अपभ्रंश भाषेपासून घेतले आहेत. मराठी कवितेंत सामान्यतः आढळणारे अन्त्य यमक अपभ्रंश भाषेपासून आलें आहे. संस्कृत किंवा पालीमध्यें तें नाहीं. जुन्या मराठींत जें उकारप्राचुर्य (उदा. जीवु, निष्कामु, दमनकु) आहे तें अपभ्रंश भाषेच्या परिणामामुळेंच होय.

ह्या सर्व पुराव्यावरून असें दिसतें कीं 'मराठी' ही कोणत्या तरी एका प्राकृतापासून—महाराष्ट्री किंवा अपभ्रंश—ह्यापासून निघाली असें म्हणवत नाहीं. महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन्हीं भाषांचीं चिन्हें—इतर भाषांपेक्षां—बरोबरीनें व बरींच मराठींत ज्याअर्थी आढळतात, त्याअर्थी ती ह्या दोन्ही भाषांच्या मिश्रणानें तयार झाली असें ठरतें. महाराष्ट्रीपासून मराठीनें आख्यात विभक्तींचा भाग किंवा काळ, अर्थ वगैरे क्रियापदास लागणारे प्रत्यय उचलले, व अपभ्रंशापासून कारकाविभक्तींचा किंवा नामाच्या प्रत्ययांचा भाग उचलला. अशा रीतीनें मराठीच्या उत्पत्तींत ह्या दोन्ही भाषांचा सारखाच भाग आहे. मराठी ही महाराष्ट्री व अपभ्रंश ह्या दोन भाषांपासून उत्पन्न झाली. सातव्या शतकांतील शिलालेखांत मराठी शब्द आढळतात. त्यावरून मराठी भाषा ही इसवी सनाच्या सातव्या शतकांत जन्म पावली असें म्हणावयास हरकत नाहीं.

# ४

# मराठी साहित्याचें स्वरूप

प्रस्तुत प्रकरणांत मराठी साहित्याचा थोडक्यांत विचार करण्याचें ठरविलें आहे. हा विचार करीत असतांना प्रथमच आपणाला मराठीची स्थूलमानानें साक्षात् जननि अशी जी महाराष्ट्री भाषा, तिच्यांतील साहित्याच्या निर्देश करणें प्राप्त आहे. शकपूर्व सातव्या शतकापासून ते शकोत्तर सहाव्या शतकापर्यंत म्हणजे सुमारे हजार-बाराशे वर्षेंपर्यंत महाराष्ट्रांत महाराष्ट्री भाषा सरसहा वापरली जात होती. इतकेंच नाहीं तर या भाषेनें अखिल भारतीय कीर्ति त्या काळांत मिळविली होती. कात्यायन व वररुचि या दोघा प्राचीन ग्रंथकारांनीं आपल्या व्याकरणविषयक ग्रंथांत महाराष्ट्री ही तत्कालीन इतर प्राकृतांहून श्रेष्ठ प्रकारची भाषा होय, असें स्वच्छ म्हटलें आहे. महाराष्ट्री भाषा ही केवळ मराठीचीच जननि नसून अर्वाचीन हिंदी व गुजराती या भाषांचीहि जननि[1] आहे. गाथासु महाराष्ट्री म्हणजे गाथांची भाषा महाराष्ट्री असें आलंकारिक म्हणतात. यावरून गाण्याची भाषा प्राचीन काळीं महाराष्ट्रीच होती असें म्हणावें लागतें. असें असलें तरी महाराष्ट्री ही भाषा पाली किंवा अर्धमागधी प्रमाणें कोणत्याहि पंथाच्या धर्मग्रंथांची भाषा नसल्यामुळें केवळ महाराष्ट्री भाषेंत असें वाङ्मय फारसें आढळत नाहीं. सेतुबंध, सप्तशती व कर्पूरमंजरी हेच महाराष्ट्रीमधील उपलब्ध असलेले प्रमुख ग्रंथ होत. सेतुबंध ग्रंथाचा कर्ता प्रवरसेन होता. सप्तशतींत प्राकृत सुभाषितांचा संग्रह करण्यांत आला असून, त्याचें कर्तृत्व शातवाहन राजा हाल यांजकडे जातें. हा ग्रंथ शकारंभीं किंवा शकपूर्व पहिल्या शतकात लिहिला

---

१. राजारामशास्त्री भागवत–मराठ्यांसंबंधी चार उद्गार.

गेला. सप्तशती ग्रंथांत हल्लींच्या मराठींत सांपडणारे भण्डण (भांडण), बोलिस्सम् (बोलेन), बाहुल्लअं (बाहुलें), वेल्लहळ (वेल्हाळ), वइ (वई), संवाडि (सांगाडी, सांगड) इत्यादि अनेक शब्द बहुतेक जसेच्या तसेच सांपडतात. कर्पूरमंजरीचा कर्ता राजशेखर याला त्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रतींत अनेक ठिकाणीं महाराष्ट्रचूडामणि असें म्हटलेलें आहे. कर्पूरमंजरींतील श्लोक महाराष्ट्रीय आहेत. ह्या ग्रंथांत पक्खाउज्ज (पखवाज) ढिल्ल (ढिला) इत्यादि बरेच शब्द हल्लींच्या मराठींत आढळतात तसे आहेत.

इसवी सनाच्या सातव्या शतकापासून महाराष्ट्रीची कन्या मराठी भाषा ही महाराष्ट्रांत बोलली जाऊं लागली. जरी ही बोलभाषा होती तरी तिच्यांत जोरदार अशी ग्रंथरचना बाराव्या शतकापर्यंत झालेली दिसत नाहीं. याचें एक कारण संस्कृत भाषेचा पगडा. त्या काळांत शिक्षण घेणारे फार थोडे लोक होते, व जे होते त्यांचा ओढा संस्कृतकडे होता. साहजिकच या पांचशे वर्षांत शिलालेखांतील—सामान्य जनसमूहाला कळण्याकरितां म्हणून योजिलेल्या कांहीं वाक्यांखेरीज मराठी साहित्याचा संसार अन्यत्र आढळत नाहीं. अगदीं प्राचीन शिलालेख म्हैसूर संस्थानांतील श्रवणबेळगोळ येथील असून, त्याचा लेखनकाल इ. स. ९८३ आहे. ह्याला गोमतेश्वराचा शिलालेख म्हणतात. शिलेवर लिहिलेलें पहिलें मराठींतील वाक्य या लेखांत जें आढळतें तें असें—

"श्री चावुण्ड राजे करवियलें
गंगराजे सुत्ताले करवियले"

दुसरा एक उल्लेखनीय शिलालेख चाळीसगांव जवळच्या पाटण गांवांतील देवीच्या देवळाच्या बाहेरच्या भिंतीवर आहे. हा लेख ज्ञानेश्वरीच्या पूर्वी ८४ वर्षे म्हणजे इ. स. १२२६ ह्या सालचा आहे. लीलावती नांवाच्या ग्रंथाचा कर्ता जो सुप्रसिद्ध भास्कराचार्य त्याच्या नातवाच्या—चांगदेवाच्या नांवानें हा लेख खोदविला आहे. ह्या लेखाच्या शेवटच्या कांहीं ओळी मराठींत आहेत त्या येणें प्रमाणें:—

"इयां पाटणीं जें केणें उघटे तेहाचा असि आउं जो राऊला होता

ग्राहकापासी तो मठा दिन्हला । ब्राह्मणा जे विकते या पासी ब्रह्मोत्तर ते ब्रह्मणीं दिन्हले ग्राहकापासी दामाचा वीसावो आसूपाठी नगॅरे दिन्हला । पांच फोफली ग्राहकापासी पाहिलेआ घाणे अदाणाची लेटि मठा दिन्हली । जेती घाणे वाहति तेतीयां प्रति पली पली तेला येथ ( जें ) मविजे मर्डीजेन मापे मवाव ॥

मराठी भाषेंत साहित्यानिर्मितीला बाराव्या शतकापासून सुरुवात झाली. बाराव्या शतकापासून ते सोळाव्या शतकापर्यंतच्या पांचशें वर्षांच्या काळांत जें साहित्य निर्माण झालें तें बव्हंशीं धार्मिक व तत्वज्ञानविषयक असें होतें. मुकुंदराजापासून ते एकनाथाच्या काळापर्यंत सामान्यत: जें वाङ्मय निर्माण झालें तें सर्व ईश्वरविषयक, देवताविषयक असें होतें. या काळांतील ग्रंथ-कारासमोर तेनतेच विषय असले, तरी त्यांनीं त्याची मांडणी भारदस्त रमणीय व वैशिष्ट्यपूर्ण अशी केली आहे. वेदांतासारखा विषय जो संस्कृत भाषेच्या कडीकुलुपांत असल्यानें केवळ पंडितांनाच उपलब्ध होता, तो ह्या ग्रंथकारांनीं मराठींत आणून त्याला लोकभोग्य बनविलें. ईश्वरप्राप्तीचा सुलभ मार्ग म्हणजे भक्ति हा असून तिला अवडंबराची जरूरी नाहीं. संसारांत असूनहि मनुष्याला शांति आणि समाधान हीं मिळूं शकतात, प्रत्येकानें आपापल्या धर्माप्रमाणें वागण्यांतच खरा मोक्ष आहे, इत्यादि तत्वांचा प्रसार ह्या ग्रंथकारांनीं इतक्या सुलभ प्रासादिक व मनोहर शब्दांत केला कीं त्यापायीं एक प्रकारचें धार्मिक ऐक्य व सामाजिक सहिष्णुता हीं महाराष्ट्रांत निर्माण झालीं.

ह्या ग्रंथकारांत आद्यग्रंथकाराचा मान मुकुंदराज यांच्याकडे जातो. मुकुंदराजानें लिहिलेले 'विवेकसिंधु' व (इ. स. ११८८) व 'परमामृत' असे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. हे दोन्ही ग्रंथ अद्वैतपर असून ओवीबद्ध आहेत. त्यांची भाषा सरळ, सुबोध आणि प्रासादिक आहे. मुकुंदराज हा नाथ-संप्रदायी होता. ज्ञानेश्वरादि संतहि याच नाथसंप्रदायांतील आहेत. या संप्रदायांतील मच्छिंद्रनाथ, गोरक्षनाथ, गैनीनाथ वगैरे संत विशेष प्रसिद्ध

आहेत. हा पंथ उत्तर हिंदुस्थानांतून खालीं महाराष्ट्रांत आला व त्यानें प्रष्कळच धर्मजागृति केली. नाथसंप्रदायी शिवभक्त असून त्यांच्यांत योगाभ्यास शिशेष चालत असे. योग, वैराग्य आणि अद्वैतसिद्धांत हीं संप्रदायाचीं मुख्य तत्त्वें सांगतां येतील. या संप्रदायांतूनच पुढें भागवतधर्म ऊर्फ वारकरी संप्रदाय निवाला, आणि त्यानें भक्तिप्रधान धर्माचा प्रसार महाराष्ट्रांत केला.

मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर या दोन ग्रंथकारांच्या मध्यंतरीच्या काळांत महानुभाव पंथाचें प्रमुख वाङ्मय येतें. हा पंथ चक्रधरानें बाराव्या शतकांत स्थापन केला. वेद, गीता, भागवत इत्यादि ग्रंथांना या पंथाची मान्यता असूनहि चातुर्वर्ण्यावर त्यानें केलेले आघात, कडक वैराग्य, कडक अहिंसा, एकांतवास, स्त्रिया आणि शूद्र यांना संन्यास देण्याची प्रथा व स्वधर्मतत्त्वें गुप्त ठेवण्याबाबतींत त्यानें दाखविलेला कटाक्ष इत्यादि कारणांनीं या पंथासंबंधानें जे गैरसमज निर्माण झाले होते ते अगदी कालपरवापर्यंत चालू होते. असें असलें तरी या पंथाचा सखोल व सार्वत्रिक नसला तरी पंजाब, काश्मीर, काबूलसारख्या दूरदूरच्या देशांत बराच प्रसार झाला. या पंथाचें सर्व वाङ्मय मराठींत लिहिलें गेल्यानें, मराठी साहित्याच्या प्रसाराच्या दृष्टीनें फारच फायदा झाला. दुसरें हे ग्रंथ मराठी भाषेंत पण सांकेतिक लिपींत लिहिले गेल्यानें, बाराव्या शतकांतील मराठीचें स्वरूप जसें होतें तसें तें टिकविण्याच्या कामीं मदतच झाली. सिद्धांतसूत्रपाठ व लीलाचरित्र हे दोन गद्यग्रंथ महानुभाव अत्यंत पवित्र मानतात. पहिला ग्रंथ केशवराज सूरी यानें लिहिला असून त्यांत चक्रधरानें आपल्या शिष्यांना वेळोवेळीं केलेला उपदेश ग्रंथित केला आहे. दुसरा ग्रंथ महींद्र व्यास उर्फ महीभट्ट यानें रचिला असून, त्यांत चक्रधराच्या लीला किंवा त्यांचें चरित्र वर्णन करण्यांत आलें आहे. या दोन ग्रंथांखेरीज कवीश्वर भास्करकृत शिशुपाल वध (शके ११९५) व एकादशस्कंद ( शके ११९६), दामोदर पंडितकृत वत्सहरण (श. १२००), नरेंद्रकविकृत रुक्मिणीस्वयंवर (शके

१२१३), रवळो व्यासकृत सह्याद्रिवर्णन (शके १२२४), पंडित विश्वनाथ बाळापूरकरकृत ज्ञानप्रबोध (शके १२५३) आणि नारोव्यासकृत ऋद्धि-पुरवर्णन (शके १२८५) हे सात ग्रंथहि महानुभाव पूज्य मानतात. हे सर्व ग्रंथ ओवीबद्ध आहेत. अभिजात वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहतां शिशुपालवध व रुक्मिणी स्वयंवर[२] हे ग्रंथ अत्यंत सरस आहेत. या मुख्य साहित्याखेरीज आणखीहि कांहीं लहानमोठे ग्रंथ महानुभाव पंथांतील लोकांनीं लिहिले आहेत.

महानुभाव पंथांत भास्करकवि, नरेंद्रकविसारखे प्रतिभासंपन्न लेखक असूनहि, त्यांच्या ग्रंथांचा प्रसार त्याकाळीं तरी फारसा झालेला दिसत नाहीं. याचें एक कारण म्हणजे महानुभाव पंथीयांचीं एकांतिक मतें हें असावें. रचनाकालींच साऱ्या महाराष्ट्रानें एखाद्या ग्रंथाला शिरावर धरलें असेल तर तो ज्ञानेश्वरी ( शके १२१२ ) हा ग्रंथ होय. भाषेचें प्राचीनत्व, विषयाचें गांभीर्य, वाणीचें माधुर्य, प्रतिपादनाचें कौशल्य, उपमादृष्टांतादिकांचें समर्पकत्व आणि भक्तिभावाचें उत्कटत्व इत्यादि दृष्टींनीं ज्ञानेश्वरांचा ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठींतील आद्यग्रंथ म्हणून जो समजला जातो तो सर्वथैव योग्य आहे. 'ज्ञानेश्वरी' ही भगवद्गीतेवरील बहारीची टीका असून तिचें मूळनांव भावार्थदीपिका असें आहे. या ग्रंथाला वारकरी संप्रदायांत फार मान असून त्याला ते 'आई' असें संबोधितात. तत्त्वज्ञान आणि काव्य या दोन्हीं दृष्टीनें हा ग्रंथ केवळ अपूर्व आहे. ज्ञानेश्वरीनें वारकरी संप्रदायाचा पाया घातला आणि तो संप्रदाय वाढीस लाविला. ज्ञानेश्वरांचा दुसरा ग्रंथ 'अमृतानुभव' हा स्वतंत्र असून वेदांतपर आहे. ज्ञानेश्वरांप्रमाणेंच त्यांचे बंधु निवृत्तिनाथ, सोपानदेव आणि बहीण मुक्ताबाई यांनींहि मराठींत रचना केली आहे. संन्याशाचीं मुलें म्हणून जनतेकडून धिक्कारलेल्या गेलेल्या ह्या चार भावंडांनीं अल्प वयांत महाराष्ट्रांत जी प्रचंड विचारजागृति व धर्मजागृति केली तिला अन्यत्र तोड नाहीं.

ज्ञानेश्वर ज्या काळांत होऊन गेले त्याच काळांत आणखी अनेक साधुसंत होऊन गेले. नामदेव व त्यांचे कुटुंब, सांवता माळी, विसोबा

खेचर, गोरा कुंभार, नरहरी सोनार, बंका महार, चोखा मेळा, परसा भागवत, कान्होपात्रा, सेना न्हावी, जोगा परमानंद तेली, सजन कसाई इत्यादि कवींचीं नांवें पाहिलीं म्हणजे वारकरी संप्रदाय समाजाच्या सर्व थरांमध्यें कसा पसरत चालला होता हें दिसून येतें. ह्यांतील विशेष उल्लेख करण्यासारखा कवि नामदेव (जन्म इ. स. १२७०) हा होय. हा जातीनें शिंपी असून, याच्या कुटुंबांत विठ्ठलाची भक्ति पिढ्यानुपिढ्या चालत आली होती. ज्ञानेश्वरादि भावंडांच्या बरोबर यानें भरतखंडांतील प्रसिद्ध तीर्थांची यात्रा केली व भागवतधर्माचा प्रसार केला. नामदेवाचे कित्येक अभंग शिखांचा आदिग्रंथ जो ग्रंथसाहेब त्यांत आढळतात. नामदेवाची अभंग-रचना बरीच असून, त्याच्या अभंगांत विलक्षण गोडी व जिव्हाळा आहे. मराठी काव्यांत एक प्रकारचा अद्‌भुत भक्तिरस त्यानें प्रथम निर्माण केला. कधीं देवाची करुणा भाकून, तर कधीं त्याच्यावर रागावून, कधीं त्याच्याशीं प्रेमाचा रुसवा धरून, तर कधीं त्याला पेंचांत धरून नामदेवानें भावोत्कट असे अभंग रचिले आहेत. ज्ञानेश्वरादि भावंडांप्रमाणें नामदेवाचें सारें कुटुंब भक्तिपर अभंग रचीत असे. इतकेंच नाहीं तर दासी जनाबाई ही तर बहारीचे अभंग तयार करी. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानाचा प्रसार केला तर नामदेवांनीं नामाचा (भक्तिचा) प्रसार केला.

नामदेवानंतरच्या सुमारे अडीचशे तीनशे वर्षांच्या काळांत नांवाजण्या-जोगे फारसे ग्रंथकार झालेच नाहींत. याचें कारण या काळांत महाराष्ट्रावर मुसलमानांचें आक्रमण होऊन, त्यांची सत्ता येथें सुरू झाली. हा काळ अत्यंत अशांततेचा व अस्थिरतेचा असा गेला. यावनी भाषा, यावनी आचारविचार, यावनी धर्म यांचा महाराष्ट्रीयांवर इतका जबरदस्त परिणाम झाला कीं ते आपले स्वत्व जवळजवळ विसरले. याच काळांत महाराष्ट्रांत नृसिंह सरस्वती आणि जनार्दनस्वामी यांनीं दत्तसंप्रदाय सुरू केला. नृसिंह सरस्वती यांचे एक शिष्य गंगाधर सरस्वती यांनीं 'गुरुचरित्र' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत नृसिंह सरस्वती व त्यांचे अगोदरचे श्रीपादश्रीवल्लभ

यांना दत्ताचे अवतार समजून त्यांच्या अनेक लीलांचें वर्णन केलें आहे. दत्तसंप्रदायानें शिव आणि विष्णु हे एक आहेत हें लोकमनावर ठसविलें तसेंच, यांतील संतांनीं हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचेंहि पुष्कळ प्रयत्न केले.

महाराष्ट्रांतील यावनी अंमलाच्या उत्तरार्धात संतकवि एकनाथ (इ. स. १५४८–१५९९) यांनीं आपलें साहित्य निर्माण केलें. एकनाथाची रचना विविध व अफाट आहे. त्यांच्या भारुडांवरून तत्कालीन देश-लोक-स्थितीची यथार्थ कल्पना येते. एकनाथांच्या प्रमुख ग्रंथांत चतुःश्लोकी भागवत टीका, एकनाथी भागवत, रुक्मिणी स्वयंवर आणि भावार्थ रामायण यांची गणना होते. यापैकीं एकनाथी भागवत हा ग्रंथ वारकरी संप्रदायांत शिरोधार्य मानला जातो. एकनाथांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथाच्या अनेक प्रती तपासून शुद्ध प्रत तयार केली. संसारांत राहूनहि परमार्थ कसा करतां येतो, हें एकनाथांनीं आपल्या जीवनावरून सिद्ध केलें. सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवून माणसानें आपापलीं कर्तव्यें करावींत, निरहंकृति राहून भक्ति करावी, निष्काम आणि ज्ञानयुक्त भक्ति हें मोक्षाचें मुख्य साधन आहे इत्यादि उपदेश एकनाथांनीं आपल्या ग्रंथांत मुख्यतः केला आहे.

एकनाथांच्या समकालीन दुसरे कवि म्हणजे दासोपंत (इ. स. १५५१-१६१५) हे होय. हे दत्तसंप्रदायी होते व त्यांची काव्यरचना विपुल आहे. त्यांच्या ग्रंथांत गीतार्णव, पदार्णव व ग्रंथराज प्रमुख आहेत. दासोपंतांचीं कांहीं पदें नामदेवाच्या अभंगाइतकी भावपूर्ण आहेत.

आतांपर्यंत उल्लेखिलेले बहुतेक सर्व कवि प्रायः वेदांतपर अशीच कविता करीत. वेदांताच्या मगरमिठींतून मराठी कवितेला एकनाथांनीं आपल्या रुक्मिणी स्वयंवर काव्यांत सोडविली असली, तरी तिची खरी सुटका त्यांचे नातू कविवर्य मुक्तेश्वर (इ. स. सुमारे १६०० ते १६५०) यांनींच केली. मुक्तेश्वरांच्या पूर्वी भास्कर व नरेंद्र ह्या महानुभावीय कवींनीं आख्यानपर रचना केली असली, तरी आख्यानपर कविता लोकप्रिय करण्याचें सारें श्रेय मुक्तेश्वरांनाच दिलें पाहिजे. मुक्तेश्वर हा खराखुरा प्रतिभासंपन्न कवि होता

याची साक्ष त्याच्या महाभारतापैकीं उपलब्ध असलेल्या आदि, सभा, वन, विराटादि पर्वांवरून पटते. मुक्तेश्वराच्या काव्यांत प्रसाद आणि प्रतिभा हे गुण ओतप्रोत भरलेले आढळतात. ज्ञानेश्वरानें जसा संतवाङ्मयाचा पाया घातला तसा मुक्तेश्वरानें लौकिक वाङ्मयाचा पाया घातला.

सतराव्या शतकांत व शिवाजी महाराजांच्या काळांत प्रसिद्धीस आलेल्या कवींत तुकाराम, रामदास, वामन पंडित व रघुनाथ पंडित यांची प्रामुख्यानें गणना केली जाते. यांपैकीं तुकारामबुवा शिवाजी महाराजांच्या पूर्वकालांत चमकले व रामदास वामनादि कवि हे उत्तरकालांत विशेष गाजले. महाराष्ट्रांत पुनश्च स्वराज्याची स्थापना झाली असूनहि, एकट्या रामदासाखेरीज बाकीच्या कवींचें या गोष्टीकडे लक्ष गेलेलें दिसत नाहीं. तुकाराम स्वतः संसारी असूनहि त्याचे काव्य प्राय: निवृत्तिपर असें आहे. उलट रामदास हे संसारी नसूनहि त्यांनीं प्रवृत्तिपरकाव्य निर्माण केलें आहे. तुकारामानें मुख्यतः अभंगांत रचना केली असून, त्याच्या अभंगांत विलक्षण जिव्हाळा गोडी व भगवद्भक्ति आहे. वारकरी संप्रदायांत ज्ञानेश्वर-एकनाथांच्या खालोखाल तुकारामाचा सन्मान केला जातो. रामदासाचें काव्य विपुल आहे. त्यांत दासबोध हा ग्रंथ विशेष लोकप्रिय झाला आहे. काव्यदृष्ट्या हा ग्रंथ सामान्य असला, तरी त्यांतील विचार जोरदार व उत्साहवर्धक आहेत. रामदासानें महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर जी मठांची स्थापना केली होती, तिच्यामुळें शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यसंस्थापनेच्या कार्याला मदतच झाली असली पाहिजे. दासबोधाच्या खालोखाल रामदासाचे 'मनाचे श्लोक' गेलीं तीन साडेतीन शतकें झालीं लोकांच्या जिव्हाग्रीं जाऊन बसले आहेत.

वामन पंडितांचा मुख्य ग्रंथ यथार्थदीपिका हा होय. या ग्रंथांत ज्ञानयुक्त सगुणभक्ति हीच सर्वश्रेष्ठ होय असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे. ज्ञानेश्वरांनीं गीतेचा अनुवाद करण्याच्या उद्देशानें भावार्थदीपिका (ज्ञानेश्वरी) लिहिली, तर वामनानें त्याच कार्यासाठीं यथार्थदीपिका रचिली. या ग्रंथांत विद्वता भरपूर आहे. पण काव्यदृष्ट्या ज्ञानेश्वरीची बरोबरी त्याला करतां येणें शक्य

नाहीं. यथार्थदीपिकेखेरीज वामनानें गजेंद्रमोक्ष, सीतास्वयंवर, कात्यायनीव्रत, वनसुधा, राधाविलास इत्यादि काव्यें रचिलीं असून तीं भावमधुर व कृष्णभक्तिप्रधान आहेत. रघुनाथपंडिताची प्रसिद्धी मुख्यतः त्याच्या नलदमयंतीस्वयंवर ह्या काव्यामुळेंच आहे. हें काव्य कल्पना व भाषा ह्या दोन्ही दृष्टींनीं रमणीय आहे. याच काळांत वडगांवचे जयरामस्वामी, निगडींचे रंगनाथस्वामी, ब्रह्मनाळचे आनंदमूर्ति, हैद्राबादचे केशवस्वामी, नागेश व विठ्ठल इत्यादि कवि होऊन गेले.

अठराव्या शतकांत होऊन गेलेल्या कवींत कचेश्वरबुवा, निरंजनमाधव, सामराज, श्रीधर, महिपति, कृष्णदयार्णव, मध्वमुनि, अमृतराय व कविवर्य मोरोपंत हे प्रमुख होते. त्यांतहि श्रीधर, महिपति व मोरोपंत हे विशेष गाजले. श्रीधर हा अठरापगड जातीचा आवडता कवि आजहि असून हरिविजय–पांडवप्रताप–शिवलीलामृत हे त्याचे काव्यग्रंथ मोठ्या भक्तीनें महाराष्ट्रांत वाचले जातात. महिपतीच्या भक्तीविजय–संतलीलामृत–भक्तलीलामृत ग्रंथावरहि भाविकांच्या अशाच उड्या आहेत. मोरोपंतांनीं विपुल, विविध व विशुद्ध काव्यरचना करून मराठी काव्याला श्रेष्ठ पदवीस पोंचविलें. मोरोपंत हे नामदेव-तुकारामाप्रमाणें सामान्य लोकाचे कवि नसून समाजांतील वरच्या दर्जाच्या लोकांचे कवि आहेत. मोरोपंतांनीं भारत, भागवत, रामायण हीं सर्व काव्यें संक्षेपानें मराठींत आणिलीं आहेत. त्यांच्या काव्याचें मुख्य वृत्त 'आर्या' हें असून, त्यांच्या काव्यांत यमक, प्रास, अनुप्रास वगैरे शब्दालंकारांची रेलचेल आहे. ईश्वराच्या स्तुतिपर असलेलें 'केकावलि' हें त्यांचें काव्य अत्यंत आल्हादकारक, सरस, जिव्हाळयानें भरलेलें व स्वतंत्र असें आहे.

वर उल्लेखिलेल्या भक्तिप्रधान काव्याखेरीज अठराव्या शतकांतच महाराष्ट्रांत विपुल असें ऐहिक काव्य शाहिरांनीं निर्माण केलें. हें काव्य सर्वस्वी स्वतंत्र असून त्यांत तत्कालीन महाराष्ट्राचें यथार्थ प्रतिबिंब पडलेलें आढळतें. हें काव्य पोवाडे व लावण्या यांच्या रूपानें असून तें सकस,

प्रांजळ व जोरदार आहे. युद्धावर पराक्रम गाजविलेल्या वीरांच्या कथा पोवाड्यांत आहेत, तर त्याच वीरांकरितां झुरणाऱ्या विरहिणींची मन:स्थिति लावण्यांत प्राय: वर्णिली आहे. ह्या शाहीर कवींत प्रभाकर, होनाजी, रामजोशी, अनंतफंदी, सगनभाऊ व परशुराम हे विशेष प्रसिद्ध मानले जातात. यांच्या काव्यावर दीडशे वर्षांपूर्वीचा कर्ता महाराष्ट्र मनापासून खूष होता.

एकोणीसाव्या शतकापासून मराठी वाङ्मयाला कांहीं निराळेंच स्वरूप प्राप्त झालें. प्रकृति आणि पोषाख या दोन्ही दृष्टींनीं हें वाङ्मय पूर्वीच्या वाङ्मयाहून भिन्न असें तयार झालें. याचें मुख्य कारण ह्मणजे इ.स. १८१८ मध्यें महाराष्ट्रांत पेशवाई नष्ट होऊन तिच्याजागीं सर्वत्र इंग्रजांचें राज्य सुरू झालें. हीं जी राज्यक्रांति झाली तिच्यामुळें सुरवातीचें जें वाङ्मय निर्माण झालें ते बव्हंशीं निस्तेज, परभृत, तेजोभंग करणारें, दास्यवृत्तिद्योतक शालोपयोगीं व बालोपयोगीं पुस्तकें आणि कोशव्याकरणादि ग्रंथांनीं सजलेलें असें निर्माण झालें. या वाङ्मयाची प्रत्यक्ष स्फूर्ति इंग्रजांकडूनच आली. ब्रिटिश पार्लमेंट, मिशनरी संस्था व कंपनी सरकार यांचें प्रयत्न या वाङ्मय-निर्मितिच्या बाबतींत प्रमुखत्वें झाले. मुंबईचें त्यावेळचे गव्हर्नर माऊंट स्टुअर्ट एलफिन्टन यांच्या उदार धोरणानें बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी (१८२२) सारख्या संस्थेची स्थापना होऊन, अनेक उपयुक्त इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें या काळांत प्रसिद्ध झालीं. मुंबई येथील स्कॉटिश व अमेरिकन मिशन व रामपूर येथील मिशन यांच्या साहाय्यानें पुष्कळ शालोपयोगी वाङ्मय निर्माण झालें. संस्कृत काव्यें व नाटकें यांचीं भाषांतरें याच काळांत पुष्कळशीं प्रसिद्ध झालीं. भाषांतररूप व कोश-व्याकरणादि वाङ्मयाच्या काळांत विलियम कॅरी, मोल्सवर्थ, कँडी, ज्यॉर्ज जर्व्हिस, सदाशिव काशिनाथ उर्फ बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, हरि केशवजी, दादोबा पांडुरंग, परशुरामपंत तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गणेशशास्त्री लेले, कृष्णशास्त्री राजवाडे, महादेवशास्त्री कोल्हटकर इत्यादि ग्रंथकार प्रमुख

समजले जात असत. इ. स. १८२० ते १८६० पर्यंतच्या काळांत निर्माण झालेल्या वाङ्मयांत परधार्जिणेपणा विशेष आढळतो. पाश्चिमात्य संस्कृतीच्या लखलखाटानें आपले लोक अगदी दिपून गेल्यानें त्यांना इकडच्या सर्व गोष्टी वाईट व तिकडच्या सर्व चांगल्या वाटू लागल्या. विनायक कोंडदेव ओक म्हणतात त्याप्रमाणें इ. स. १८६०-६१ पर्यंत साहेबानें कांहीं वाईट केलें, असें कोणत्याहि लेखांत आढळावयाचें नाहीं. ही परिस्थिति थोड्या प्रमाणावर नी. ज. कीर्तने व मोठ्या प्रमाणावर विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं बदलली. ग्रँटडफच्या मराठी बखरींतील चुका दाखवून इंग्रजहि चुकतो, हें कीर्तन्यांनीं प्रथम सांगितलें. १८६० ते १८७४ पर्यंतच्या काळांत विनायक जनार्दन कीर्तने, मोरोबा कान्होबा, रिसबूड, हळबेशास्त्री, बाबा पदमनजी व रा. ब. गोपाळ हरि देशमूख उर्फ लोकहितवादी यांनीं स्वतंत्र व स्फूर्तिप्रद असें बरेंच वाङ्मय निर्माण केलें.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं आपली सुप्रसिद्ध 'निबंधमाला' इ. स. १८७४ मध्यें सुरू करून, वाङ्मयाचें नवें युग अवतीर्ण झाल्याचें घोषित केलें. स्वभाषा, स्वधर्म, स्वदेश, स्वेतिहास इत्यादि संबंधीं योग्य अभिमान त्यांनीं लोकांत तीव्रतेनें जागृत केला. परकीयांचें चांगलें असेल त्याचा स्वीकार करून आणि आपल्या चांगल्या संस्कृतीची जोपासना करून आपण आपली उन्नति केली पाहिजे, आपणच आपला तेजोभंग करतां कामा नये, असें त्यांनीं आपल्या उपरोधपूर्ण व तेजस्वी लेखणीनें लोकांना पटवून दिलें. या पुढील काळांत मराठी वाङ्मय स्वतंत्र, समृद्ध, विविध, विपुल, वैशिष्ट्यपूर्ण बनून तें शतमुखानें (कीं शतहस्तांनीं) वाढूं लागलें. निबंध, लघुनिबंध, लघुकथा, लघुतम कथा, कादंबरी, काव्य, नाटक, इतिहास, विविध शास्त्रें इत्यादि अनेक वाङ्मयप्रकार मराठींत हळुहळू रूढ होऊन, त्यांनीं मराठी साहित्य चांगलेंच सुदृढ व सकस बनविलें आहे.

प्रौढ, रसभरित व आवेशयुक्त निबंधाची प्रथा विष्णुशास्त्री चिपळूण-करांनीं आपल्या निबंधमालेंत सुरू केली. भाषा-वाङ्मय-धर्म-इतिहास-समाज-

कारण इत्यादि विविध विषयांवर सोपपत्तिक चर्चा व्याजोक्ति व उपहासगर्भ शैलींत निबंधमालेंत केली जाई. चिपळूणकराची ही प्रथा थोड्याफार फरकानें लो. टिळक, प्रि. आगरकर, इतिहास संशोधक वि. का. राजवाडे, शिवरामपंत परांजपे, नरसिंह चिंतामण केळकर, चिंतामणराव वैद्य, अच्युत बळवंत कोल्हटकर, श्रीपाद महादेव माटे, नरहर रघुनाथ फाटक, ग. त्र्यं. माडखोलकर इत्यादि लेखकांच्या लेखांत चालू राहिलेली आढळते. मराठी गद्य वैभवसंपन्न बनविण्यांत या मंडळीचा बराच हातभार लागला म्हणावयास हरकत नाहीं. या लेखकांपैकीं प्रत्येकानें विविध विषयावर सरस व वैशिष्ट्य-पूर्ण लेखन केलें आहे.

कादंबरी-क्षेत्रांत अद्भुतरसात्मक कादंबऱ्या लिहिणारे हळबे-रिसबूड वगळल्यास नजरेंत भरण्याजोगी व चिरस्थायी स्वरुपाची कामगिरी हरि नारायण आपटे यांच्या हातूनच झाली. हरिभाऊंनीं सामाजिक व ऐतिहासिक मिळून सुमारें वीस कादंबऱ्या व अनेक स्फुट गोष्टी लिहिल्या व हें सर्व वाङ्मय निर्माण करीत असतांना लोकशिक्षणाचा हेतु मुख्य धरून लोकरंजन त्यांनीं केलें. तत्कालीन महाराष्ट्राचा इतिहासच जणूं काय हरिभाऊंनीं लोकां-समोर ठेवला आहे. अलीकडच्या दृष्टीनें पाहतां हरिभाऊंच्या कादंबऱ्या पाल्हाळिक वाटल्या तरी त्यांत घरगुतीपणा, मानवी स्वभावाचें सूक्ष्म ज्ञान, आकर्षक कथानक इत्यादि गुण विशेषकरून आढळतात. हरिभाऊंच्या नंतर कादंबरीवाङ्मय खूपच वाढलें. द्वारकानाथ पितळे ऊर्फ नाथमाधव, ना. ह. आपटे, चिं. वि. वैद्य, शिवरामपंत परांजपे, सी. के. दामले, गो. चिं. भाटे, वा. म. जोशी, डॉ. केतकर व न. चिं. केळकर इत्यादि लेखकांनीं कादंबरीवाङ्मय चांगलेंच समृद्ध केलें. अलीकडच्या काळांत प्रो. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, पु. य. देशपांडे, भा. वि. वरेरकर, वि. वा. हडप, विभावरी शिरूरकर, कुमुदिनि प्रभावळकर, शांताबाई नाशिककर, र. वा. दिघे इत्यादि लेखक-लेखिकांनीं मराठी कादंबरी अधिक कलापूर्ण, मनोविश्लेषणात्मक व सरस बनविण्याचा प्रयत्न केला आहे.

मराठी नाट्यवाङ्मय गेल्या शंभर वर्षांतीलच असलें तरी तें कलादृष्ट्या श्रेष्ठ प्रतिचें व विपुल असें आहे. पौराणिक–सामाजिक अशीं सुमारें दीड-हजार नाटकें पुस्तकरूपानें उपलब्ध असून त्यांत श्रेष्ठ प्रतींचीं शंभर नाटकें सहज निघतील. प्रयोगरूपानें मराठी नाटकाची सुरुवात इ. स. १८४३ मध्यें सांगली येथें विष्णुदास भावे यांनीं केली. त्यांच्यानंतर एकाहून एक सरस असे नाटककार निर्माण होऊन, त्यांनीं मराठी रंगभूमि हें लोकशिक्षण व लोकरंजनाचें श्रेष्ठ प्रतीचें स्थान बनविलें. मराठी रंगभूमि ही संगीत-प्रधान असली तरी ती समाजाभिमुख असून, समाजांत वेळोवेळीं होणारी स्थित्यंतरें तिच्यावर प्रतिबिंबित झाल्यावांचून राहत नाहींत. ह्या रंगभूमीला वास्तवतापूर्ण व अद्यतन बनविण्याच्या कामीं पुष्कळच लेखकांनीं प्रयत्न केले आहेत. अण्णासाहेब किर्लोस्कर, गोविंद बल्लाळ देवल, माधवराव पाटणकर, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, राम गणेश गडकरी, न. चिं. केळकर, वासुदेवशास्त्री खरे, य. ना. टिपणीस, विष्णुपंत औंधकर, माधवराव जोशी, वीर वामनराव जोशी, मामा वरेरकर, प्रल्हाद केशव अत्रे, मो. ग. रांगणेकर, स. अ. शुक्ल इत्यादि नाटककारांनीं मराठी नाटक हा एक महाराष्ट्रीयांना अभिमानास्पद वाटणारा वाङ्मयप्रकार उत्तम प्रकारें सजविला आहे यांत शंका नाहीं.

अर्वाचीन मराठी कवितेस स्वतंत्र व प्रभावी वळण केशवसुतांपासून लागलें. पूर्वीचें काव्य ईश्वरभक्तिपर व तत्त्वज्ञानपर अधिक असे. आधुनिक काव्य ऐहिक गोष्टींचा विचार मनमोकळेपणानें करून, मानवीसंसाराचीं चित्रें रंगवितें. इंग्रजी व इतर पाश्चिमात्य काव्याच्या अभ्यासामुळें मराठी काव्यांत भावगीत, सुनीत, स्तोत्र, विलापिका इत्यादि नवीन प्रकार येऊन, काव्याच्या पोषाख पूर्वीसारखा पल्लेदार न राहतां सुटसुटीत व आकर्षक बनला. मधून मधून याहि काळांत वासुदेव शास्त्री खरे, साधुदास, चंद्रशेखर, गिरीश, यशवंत, माधव ज्यूलियन इत्यादि कवींनीं प्रदीर्घ रचना केली असली, तरी मुख्यत: या काळांतील काव्याचें स्वरूप बहुविध पण त्रुटित

असेंच राहिलें आहे. हें काव्य काव्यशास्त्राच्या दृष्टीनें सरस व रमणीय असून, त्यांत सभोंवतालच्या जनस्थितीचीं चित्रें आलीं आहेत आधुनिक काळांतील प्रमुख कवींत केशवसुत, रे. टिळक, मोगरे, लेंभे, चंद्रशेखर, विनायक, दत्त, माधवानुज, बालकवि, गोविंदाग्रज, तांबे, गिरीश, यशवंत, सावरकर, बोरकर, आत्माराम रावजी देशपांडे, गुणवंत हनुमंत देशपांडे, कुमुदबांधव, प्र. के. अत्रे व कुसुमाग्रज इत्यादिकांची गणना होते.

लघुकथा व लघुनिबंध हे वाङ्मयप्रकार विसाव्या शतकांतील धामधुमीच्या व कमी फुरसतीच्या काळांतील असून, पाश्चिमात्य वाङ्मयाच्या परिणामरूपानें ते मराठींत आले आहेत. यशस्वी लघुकथालेखकांत वि. स. खांडेकर, क्षमाबाई राव, कृष्णाबाई, एक विद्यार्थी, य. गो. जोशी, कमलाबाई टिळक व बोकील हे मुख्य असून, लघुनिबंधकारांत खांडेकर, काणेकर, प्रो. फडके व र. गो. सरदेसाई हे विशेष नावाजले गेले आहेत.

याच काळांत विनोदीवाङ्मय जवळ जवळ नव्यानेंच सुरू झालें. पूर्वीच्या पारमार्थिक वाङ्मयांत विनोद अधूनमधून क्वचित् येई. शंभर टक्के विनोदीवाङ्मय गेल्या ६०–७० वर्षांत महाराष्ट्रांत निर्माण झालें. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बाळकराम ऊर्फ राम गणेश गडकरी, प्रो. चिं. वि. जोशी, आचार्य अत्रे, कॅ. लिमये, बोकील, शामराव ओक, ना. धों. ताम्हनकर, वि. मा. दि. पटवर्धन, मो. गो. सोमण, ग. स. मराठे व भा. रा. भागवत इत्यादि लेखकांनीं विनोदी वाङ्मय आतां चांगलेंच बाळसेदार बनविलें आहे.

संक्षेपानें उल्लेखिलेल्या या सर्व वाङ्मयाच्या शेजारीं इतिहाससंशोधक राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे, पारसनीस, शंकर श्रीकृष्ण देव, रियासतकार सरदेसाई, दत्तोपंत आपटे, व प्रो. पोतदार इत्यादिकांनीं जे इतिहासविषयक ग्रंथ लिहिले आहेत ते, तसेंच डॉ. केतकर व यशवंतराव दाते यांनीं ज्ञानकोश व शब्दकोश तयार केले आहेत ते, तसेंच लो. टिळक, प्रो. श्री. म. माटे, रावसाहेब चापेकर, चिंतामणराव वैद्य, यशवंत खुशाल देशपांडे, डॉ. दप्तरी,

पावगीशास्त्री, बापटशास्त्री, प्रो. जोग, प्रो. केळकर व प्रो. कुळकर्णी इत्यादिकांनीं समाजशास्त्र-धर्मशास्त्र-ज्योतिष-भाषाशास्त्र, काव्यशास्त्र इत्यादि विविध विषयावर रचलेले ग्रंथ ठेविल्यास मराठी साहित्याचा वृक्ष किती शाखोपशाखांनीं पल्लवित होऊन फोंफावला आहे, तो किती रमणीय दिसत आहे, संसारांतील प्रवाशांना त्याची संस्कृतिरूपी शीतल छाया किती उपकारक व स्फूर्तिदायी ठरत आहे हें सहज समजतें.

---

## ५

# महाराष्ट्रांतील प्रमुख पर्वत व नद्या

**सह्याद्रि किंवा पश्चिम घाट**—हा पर्वत सुमारे एक हजार मैल लांब असून तो अरबीसमुद्राला समांतर असा उत्तरेकडून दक्षिणेकडे पसरला आहे. मुंबई-म्हैसोर-कुर्ग व मद्रास या चार प्रमुख प्रदेशांतून त्यानें आपला विस्तार केला आहे. खानदेशांतील खुंदेबारी घाटापासून त्याची सुरुवात होते. त्रिंबक-पर्यंतच्या सुमारे शंभर मैलाच्या भागांत हा पर्वत दक्षिण पश्चिमेकडे झुकत जातो. पुढें तो खंडाळाच्या घाटापर्यंत दक्षिण-पूर्वेकडे झुकत जातो. यांतूनच पूर्वेकडे जाणाऱ्या डोंगराच्या रांगा निघतात. त्यांपैकीं तापी आणि गोदावरी मधील सातमाळ डोंगराच्या रांगा आणि महादेवाचे डोंगर विशेष प्रसिद्ध आहेत. सह्याद्रीच्या मुख्य उंचवट्यावर सुमारे शंभर किल्ले असून ते सर्व ऐतिहासिक दृष्ट्या प्रसिद्ध आहेत. उत्तरेकडून दक्षिणेकडे जात असतांना ह्या घाटांत महाराष्ट्रांतील महत्त्वाची स्थळें आहेत तीं येणें प्रमाणें:—(१) भडोच आणि महाराष्ट्र यांतील व्यापारी वाहतुकीचा खुंदेबारी घाट; (२) बाभुळणा घाटाचे रक्षण करणारे साल्हेर व मुल्हेरचे किल्ले; (३) गोदावरीचा उगम असलेलें त्रिंबक क्षेत्र; (४) मुंबई-आग्रा रस्ता व जी. आय. पी. रेल्वे ज्यांतून जाते तो थळघाट; (५) नाशिक आणि कल्याण किंवा नाशिक आणि सोपारा-कडे नेणारा जुना वाहतुकीचा रस्ता असलेला आणि अलंग व कलंग या किलयांनीं रक्षिलेला पिपरी घाट; (६) ५४२७ फूट सर्वांत उंच असलेलें कळसुबाईचें शिखर; (७) ४६९१ फूट उंच असलेला हरिश्चंद्रगड; (८) जुन्नर आणि कोंकण यांतील जुना वाहतुकीचा नाणेघाट; (९) जुन्नर जवळील शिवनेरी किल्ला; (१०) भीमेचें उगमस्थान असलेला भीमाशंकराचा डोंगर;

(११) चाकणचा मुसलमानांचा किल्ला (१२) मुंबई-पुणें रस्ता व जी. आय. पी. रेल्वे हीं जातात तो भोर आणि खंडाळाघाट. यांतच कोंडाणें, कार्लें, भाजें, बडेसा येथील प्रसिद्ध लेणीं आहेत. (१३) बाजगी घाटांखालील नादसूर आणि करसांपळ्याचीं लेणीं; (१४) पुण्याच्या दक्षिणेकडील सिंहगढ आणि पुरंदर हे किल्ले; (१५) फिजजेराल्ड आणि पारघाटांतील प्रतापगड व कोंकणांतील रायगड हे लिल्ले; (१६) ४७१७ फूट उंचीचें असलेलें महाबळेश्वर हें हवा खाण्याचें ठिकाण व कृष्णेचा उगम असलेलें क्षेत्र महाबळेश्वर; (१७) साताराशहर व जवळील किल्ला; (१८) पाटण आणि कऱ्हाड ह्या जुन्या गांवांकडे नेणारा कुंभारीघाट; (१९) रत्नागिरी आणि कोल्हापूर हा रस्ता ज्यांतून जातो तो अंबाघाट; (२०) विशाळगढ आणि पन्हाळा हे किल्ले; (२१) देवगढ ते निपाणी रस्ता नेणारा फोंडाघाट; (२२) वेंगुर्ला ते बेळगांव मधील आंबोली व रामघाट (२३) कॅसलरॉक (२४) कारवार आणि धारवाड मधील अरबेलघाट (२५) कुमटा ते हुबळी मधील देवीमानेघाट (२६) गिरिसाप्पा धबधबा.

**कृष्णा**–दाक्षिणेंकडील मोठ्या नद्यांपैकीं एक नदी. ही जवळ जवळ पश्चिमेकडून पूर्वेकडे सबंध खंडभर वाहत जाते. पावित्र्याच्या दृष्टीनें गोदावरी आणि कावेरी ह्या नद्या कृष्णेपेक्षां श्रेष्ठ असल्या, तरी येऊन मिळणाऱ्या भीमा-तुंगभद्रेसारख्या नद्या आणि पाण्याच्या कक्षेंत असणारा भूप्रदेश यांचा विचार करतांना कृष्णा ही गोदावरी-कावेरीपेक्षां श्रेष्ठ म्हटली पाहिजे. तिची लांबी आठशें मैल आहे ह्या नदीचा उगम पश्चिमघाटांत क्षेत्र महाबळेश्वर येथें होतो. कऱ्हाडच्या पुढें गेल्यावर प्रथम तिला कोयना नदी येऊन मिळते. पुढें सांगली जवळ वारणा नदी व कुरुंदवाडाजवळ पचगंगा ह्या नद्या तिला येऊन भेटतात. पुढें ही नदी पूर्वेकडे वळून बेळगांव जिल्हयांतून व विजापूर जिल्ह्यांतून वाहत जाऊन निजामच्या हद्दींत प्रवेश करते. विजापूर जिल्ह्यांत तिला घटप्रभा आणि मलप्रभा ह्या नद्या येऊन मिळतात. पुढें रायचुर जवळ तुंगभद्रा नदी येऊन तिला मिळते.

आणि शेवटीं नळगुंदा जिल्ह्यांत तिला शेवटची नदी मुसी येऊन मिळते. हैद्राबाद संस्थानांत ही नदी जवळ जवळ चारशें मैल वहात जाते. कृष्णा नदी गुंतुर जिल्ह्यांतून वाहत असतांना ती पूर्वघाटाला येऊन मिळते. आणि तेथून एकदम दक्षिणेकडे वळून बंगालच्या उपसागराला जाऊन मिळते. बेझवाड्याजवळ कृष्णेला ६ फर्लांग लांब धरण बांधण्यांत आले असून त्यापासून सुमारें चारशे मैल लांबीचे कालवे काढण्यांत आले आहेत.

**गोदावरी**–ह्या नदीचा उगम पश्चिमघाटांत नाशिक जवळील त्र्यंबकेश्वरीं होऊन ती पूर्वघाटाकडे वहात जाऊन राजमहेंद्री जवळ बंगालच्या उपसागराला मिळते. शुचिता, उपयुक्तता आणि सौंदर्य या दृष्टींनीं ही नदी गंगा किंवा सिंधूच्या खालोखाल महत्वाची आहे. तिची लांबी नऊशें मैल आहे. मुंबई इलाख्यांतून ती सुमारें शंभर मैल वहात जाऊन पुढें निजामच्या हद्दींतून वाहते. नाशिकच्याखालीं पंधरा मैलावर तिला धारणा नदी व पुढें सतरा मैल गेल्यावर नांदेड जवळ कादवा नदी येऊन मिळते. नेवाशाजवळ तिला प्रवरा आणि मुळा या नदीचे जोडपाणी येऊन भेटतें. पैठणजवळून वाहत गेल्यावर सुमारें पावणेंदोनशें मैल ती निजामच्या हद्दींतून वाहत जाते. येथें तिला पूर्णा, मांजरा, मानेर या नद्या मिळतात. सिरोंच्याच्या खालीं तिला प्राणहिता नदी येऊन भेटते. या नदीला वर्दा व वैनगंगा येऊन आधींच मिळालेल्या असतात. येथून पुढें तीस मैल गेल्यावर इंद्रावती नदी गोदावरीला येऊन मिळते. पुढें मद्रास इलाख्यातूनच पूर्वघाटांतून वहात असतांना तिचें पात्र अगदीं अरुंद बनतें व ती खिंडींतून फार जोरानें वहात जाते. येथील सृष्टी-सौंदर्य अनुपम आहे. दौलेश्वरम् विभागांत गोदावरीला प्रचंड धरण बांधण्यांत आलें असून त्यापासून लहान-मोठे सुमारे दोन हजार मैलांचे कालवे काढण्यांत आले आहेत.

**भीमा नदी** हिचा उगम पश्चिम घाटांतील भीमाशंकराच्या डोंगरांतून होतो. तिची लांबी सुमारे दोनशे मैल आहे. पुणें-सोलापूर-विजापूर जिल्ह्यांतून ती पूर्व-दक्षिणेकडे वाहत पुढें निझामाच्या हद्दींतून वाहत जाते. रायचूर-

पासून सोळा मैलावर ती कृष्णानदीला जाऊन मिळते. पहिले चाळीस मैल नदीचें पात्र अरुंद असून ती खिंडींतून वाहते. उन्हाळ्यांत नदीचें पात्र लहान बनतें. रांजणगांवाजवळ भीमेला मुळामुठेचें संयुक्त पाणी येऊन मिळतें, आणि त्याच्यापुढें पधरामैलांवर भीमाशंकराच्याच डोंगरावर उगम पावलेली घोडनदी तिला येऊन भेटते. भोर संस्थानच्या हद्दींतून वाहणारी नीरानदी तिला टेंभुर्णीजवळ येऊन मिळते. पुढें पवित्र पंढरपूरक्षेत्रावरून वाहत असतांना तिला मान आणि सीना ह्या नद्या येऊन भेटतात. मुठा, नीरा आणि सीना ह्या नद्यांना धरणें बांधिलीं आहेत व त्याच्यांतून कालवे काढले आहेत.

**तापीनदी**—पश्चिम हिंदुस्थानांतील मोठ्या नद्यांपैकीं ही एक नदी आहे. हिची लांबी ४४० मैल असून तिचा उगम बैतुलजवळ सातपुडा पर्वतांत आहे. सूर्यानें स्वतःच्या उष्णतेपासून बचाव करण्यासाठीं ही नदी उत्पन्न केली अशी समजूत आहे. खानदेशांतून मुख्यतः ही वाहत जाते. हिच्या कांठीं पुष्कळ तीर्थें आहेत. पूर्णा व तापी यांच्या संगमावर चांगदेव नावाचें प्रसिद्ध तीर्थ आहे. सुरतेजवळील अश्विनीकुमार हें तिच्या कांठा-वरील स्थळहि पवित्र मानलें जातें. सुरतशहर व थालनेरचा किल्ला हीं या नदीच्या कांठची इतिहासप्रसिद्ध ठिकाणें आहेत.

६

# महाराष्ट्रांतील जिल्हे

(१) **पुणें जिल्हा**:—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ५३५० चौरस मैल असून लोकसंख्या इ. स. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १३५९४०८ आहे. शिवकालापूर्वी ह्या जिल्ह्याला विशेष महत्त्व नसलें, तरी शिवकालांत व पुढें पेशवाईत तो फारच पुढें आला पुण्याच्या पश्चिमेस सह्याद्रीची रांग आहे. त्यांतून कोंकण व देश यांच्यामध्यें पुष्कळ घाट आहेत. त्यांत नाणेघाट, कात्रजचा घाट, बोरघाट, केंदूरघाट व बावदेवघाट हे मुख्य आहेत. बोरघाट हा खि. पू. ३०० ते १०० पर्यंत विशेष रहदारीचा होता. घोड, भीमा, भामा, पवना, कऱ्हा, नीरा, इंद्रायणी, मूळा, मुठा वगैरे लहानमोठ्या नद्या पश्चिमेकडील घाटांत उगम पावून, त्यांपैकीं बऱ्याच भीमानदीस मिळतात. पुणें जिल्ह्याच्या पश्चिमेकडील भाग डोंगराळ व उंचवट्यावर असून त्यांत खोल खोरीं आहेत. हीं खोरीं अत्यंत सुपीक आहेत. जिल्हाच्या उत्तरेकडील सर्व भाग बागाईतीचा आहे. जिल्ह्याचें पावसाचें मान सुमारे ३१ इंच आहे.

(२) **ठाणें जिल्हा**:—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ३५७३ चौरस मैल असून, लोकसंख्या इ. स. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ९३२७३३ आहे. फार प्राचीन काळापासून या जिल्ह्याला एक प्रकारचें महत्व प्राप्त झालें आहे. त्र्यंबक डोंगरांत उगम पावणाऱ्या वैतरणी नदीचा उल्लेख महाभारतांतहि आहे. दक्षिणेकडील व्यापाराचा सर्वांत जुना मार्ग तिच्या खोऱ्यांतून होता व प्राचीन काळीं आर्य लोकांनीं तिच्या काठीं वसाहत केली होती. शूर्पारक ( हल्लींचें सोपारें ) येथें अशोककालीन शिलालेख

व बौद्धस्तूप आढळले आहेत. या जिल्यावर क्रमानें मौर्य, आंध्रभृत्य, क्षत्रप, चालुक्य, शिलाहार, मुसलमान, पोर्तुगीझ, मराठे व इंग्रज अशा रियासती क्रमानें झाल्या. बौद्ध, हिंदु व पोर्तुगीझ शिल्पकलेचे नमुने या भागांत बरेच आहेत. वारली, ठाकूर, कातकरी, काथोडी, आगरी आणि कोळी वगैरे आदिवासींचा भरणाहि या जिल्ह्यांत बराच आहे. जिल्ह्याचा बहुतेक भाग सखल असून, त्यात पूर्वेस व ईशान्येस पुष्कळ लहानमोठे डोंगर आहेत. पावसाचें प्रमाण भरपूर असल्यानें भात, बागाईत व लाकूड यांचें उत्पन्न या जिल्ह्यांत विशेष येतें. वसई, भिवंडी, डहाणू, पालघर, इत्यादि नऊ तालुके व उंबरगांव, वसई, केळवें, कल्याण, ठाणें, इत्यादि बंदरें यांत आहेत.

**(३) कुलाबा जिल्हा**:—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ २१६९ चौरस मैल असून, लोकसंख्या इ. स. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ६६८९२२ आहे. पश्चिमघाट व समुद्र यांच्यामध्यें हा प्रदेश असल्यानें यांत पुष्कळ टेंकड्याच्या माळा असून, माणिकगड (उंची १८०० फूट), कनकेश्वर (उंची १००० फूट), सागरगड (उंची ११६४ फूट) व रायगड अशीं त्यांत मुख्य शिखरें आहेत. जिल्ह्याचा समुद्राजवळील भाग नारळी पोफळींच्या झाडांनीं भरलेला असून, त्याच्या मागील भागांत भाताचें उत्पन्न मुबलक येतें. मिठागरांचें व मासळीचें उत्पन्न या भागांत चांगलेच आहे. कुलाबा जिल्ह्यावर क्रमानें आंध्र, चालुक्य, यादव, बहामनी, पोर्तुगीझ, मराठे व इंग्रज अशा राजवटी झाल्या. बौद्ध, हिंदु व पोर्तुगीझ शिल्पकलेचे नमुनें या भागांत पालें, कुडें, घारापुरी, उरण, कुलाबा, बीरवाडी, लिंगाणें, उंदेरी इत्यादि स्थळीं आहेत. अलिबाग, कर्जत, महाड, पेण इत्यादि सात तालुके या जिल्ह्यांत असून उरण, पेण, पनवेल व अलिबाग हीं मुख्य शहरें आहेत.

**(४) रत्नागिरी जिल्हा**:—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ३९९८ चौरस मैल असून, लोकसंख्या इ. स. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १३७३४६६ आहे. येथील जमीन खडकाळ असून, उंच टेंकड्यांमधून पुष्कळ

नद्या वाहतात. या नद्यांच्या तीरावर मुख्य बंदरें व सुपीक जमिनी आहेत. पश्चिम घाटाच्या टेंकड्यांत पुष्कळ खिंडी असल्यानें रत्नागिरी जिल्हा व पूर्वेकडील भाग यांच्यांत व्यापार सुकर झाला आहे. या भागांतील हवा सामान्यपणें आरोग्यकारक असून पावसाचें प्रमाण पुष्कळ आहे. बागाईत व भात तांदूळ, हीं येथील मुख्य उत्पन्नें होत. बाणकोट, हरणै, देवगड, दाभोळ, संगमेश्वर, रत्नागिरी, राजापूर, मालवण, आणि वेंगुर्लें हीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें आहेत. मौर्य, चालुक्य, मुसलमान, पोर्तुगीझ, मराठे व इंग्रज अशा रियासती येथें क्रमानें झाल्या. बौद्ध, जैन, मुसलमान, हिंदु व पोर्तुगीझ शिल्पकलेचे नमुने या भागांत पहावयास मिळतात. चिपळूण दापोली, खेड, मालवण, वेंगुर्लें वगैरे तालुके या जिल्ह्यांत असून, येथें तीनशेंच्यावर शिक्षणसंस्था आहेत. लोक सामान्यतः हुशार, साधे, काटकसरी व हुन्नरी आहेत.

(५) सातारा जिल्हा—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ सुमारें ८००० चौ. मैल असून, लोकसंख्या इ. स. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १३२७२४९ आहे. यांत सह्याद्रीचे बरेच फाटे असून सज्जनगड, अजिमतारा, पन्हाळा, कमळगड, पांडवगड, भैरवगड, वासोटा इत्यादि त्यांवर किल्ले आहेत. हा जिल्हा शिवकालापासून प्रसिद्ध असून, याच्यातील लोक शूर, धाडसी व कर्तृत्ववान आहेत. या भागांतील मुख्य नदी कृष्णा असून कोयना, वारणा, वेण्णा या लहान नद्या आहेत. येथील जमीन, हवामान, व पाणी हीं उत्कृष्ट असून त्यांचा लोकस्थितीवर चांगला परिणाम झाला आहे. या भागावर आंध्रभृत्य, यादव, बहामनी, मराठे व इंग्रज अशा क्रमानें राजवटी झाल्या. सातारा शहरांत मराठ्यांची राजधानी इ.स.१७१० ते इ.स. १८४८ पर्यंत होती.

(६) सोलापूर जिल्हा—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ४५२१ चौरस मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १०१४६७० आहे. याचा बहुतेक मुलूख सपाट असून जमीन सुपीक आहे. ह्यांत मोठी नदी

भीमा ही असून, नीरा, सीवा वगैरे लहान नद्या आहेत. पावसाचें प्रमाण या जिल्ह्यांत कमी असून, जोंधळा व कापड ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी आहेत. या भागावर आंध्रभृत्य, चालुक्य, यादव, मुसलमान, मराठे व इंग्रज अशा क्रमानें रियासती झाल्या. हेमाडपंती शिल्पकला या जिल्ह्यांत पुष्कळ ठिकाणीं पहावयास सापडते.

(७) नाशिक जिल्हा :—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ५८५० चौरस मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारी प्रमाणें १११३९०१ आहे. ह्यांत गोदावरी व गिरणा ह्या मुख्य नद्या असून, सह्याद्रि व चांदवड हे मुख्य पर्वत आहेत. गोदावरी ही अत्यंत पवित्र नदी मानली जाते व हिच्याच कांठावर नाशिक जवळील पंचवटींत प्रभु रामचंद्र हे सीता व लक्ष्मण यांच्यासह राहात होते. गिरणा नदी ही शेतीस फार उपयुक्त आहे. ह्यांत सह्याद्रीवर अंजनेरी, त्रिंबक, कुलंग इत्यादि तेवीस किल्ले असून, चांदवड पहाडावर चांदवड, धोडप वगैरे पंधरा किल्ले आहेत. नाशिक जिल्ह्यावर खि. पू. २०० तें इ. स. २०० पर्यंत आंध्र घराण्याचा अंमल असून, त्यांची राजधानी पैठण येथें होती. पुढें या भागावर क्रमानें चालुक्य, राठोड, यादव, मुसलमान, मराठे व इंग्रज अशा राजवटी झाल्या. नाशिक-सिन्नर-इगतपुरी-दिंडोरी इत्यादि बारा तालुके ह्या जिल्ह्यांत असून, नाशिक-मालेगांव-येवला- सिन्नर-इगतपुरी हीं मुख्य शहरें आहेत. हा जिल्हा चांगला सुपीक असून, येथें व्यापारी पेठाहि पुष्कळ आहेत.

(८) अहमदनगर जिल्हा :—ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ६५८६ चौरस मैल असून, लोकसंख्या ११४२२२९ आहे. ह्यांत पाणी पुरवठा कमी असल्यानें गोदावरी व प्रवरा ह्या नद्यांना कालवे घालून त्यांचा शेती-साठीं उपयोग करण्यांत आला आहे. जिल्ह्यांतील हवा सामान्यतः निरोगी व कोरडी असून, जमीन सुपीक आहे. ह्या भागावर चालुक्य, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव, बहामनी, मराठे व इंग्रज अशा रियासती क्रमानें झाल्या. अहमद निझामशहानें अहमदनगर शहर वसविलें व त्याच्याच नांवावरून

हें अहमदनगरचें किंवा निजामशाहीचें राज्य म्हणून ओळखिलें जाऊं लागलें. ह्या जिल्ह्यांत डोंगरांतील कोरीव देवळें व हेमाडपंती इमारती पुष्कळ आहेत. टोकेश्वर, पारनेर, हरिश्चंद्रगड, पेडगांव वगैरे ठिकाणचीं देवळें बरीच प्राचीन आहेत. अहमदनगर-पारनेर-श्रीगोंदे जामखेड नेवासा इत्यादि अकरा तालुके ह्यात आहेत. खर्डे येथें भुइकोट किल्ला असून, येथेंच मराठ्यांना इ. स. १७९५ मध्यें निजामावर विजय मिळाला.

(९) खानदेश जिल्हा :—इ. स. १९०६ पासून ह्या जिल्ह्याचे पूर्व खानदेश व पश्चिम खानदेश असे दोन जिल्हे करण्यांत आले आहेत. पूर्व खानदेशचें क्षेत्रफळ ४५२५ चौ. मैल असून, लोकसंख्या १३२७७२२ (१९४१ खा. सु.) आहे. पश्चिम खानदेशचें क्षेत्रफळ ५५२५ चौ. मैल असून, लोकसंख्या ९१२२१४ (१९४१ खा. सु.) आहे. पूर्व खानदेशचें जळगांव हें मुख्य ठिकाण असून, त्यांत जळगांव-जामनेर-पाचोरा-रावेर-यावल इत्यादि दहा तालुके आहेत. पश्चिम खानदेशचें धुळें हें मुख्य शहर असून, त्यांत धुळें-नंदुरबार-पिंपळनेर-शाहदा इत्यादि सात तालुके आहेत. तापी ही ह्या जिल्ह्यांतील मुख्य नदी असून, गिरणा, बोरी, पांजरा ह्या लहान नद्या आहेत. निमारपासून नंदुरबारपर्यंतचा दीडशे मैलांचा टापू सपाट मैदान असून, त्यांतील जमीन उत्तम असल्यानें येथें पुष्कळ संपन्न शहरें व खेडीं आहेत. खानदेशचा मध्यभाग व पूर्वभाग सुपीक नाहीं. उत्तरभाग व पश्चिमभाग डोंगराळ असून, त्यांत दाट अरण्यें आहेत. खानदेशांत पावसाचें प्रमाण कमी असलें, तरी जमीन सुपीक असल्यानें दुष्काळ क्वचित्‌च पडतो. या भागांत शेंकडा ९० हिंदु लोक असून मुख्य जाती कुणबी, भिल्ल, मराठे, महार, माळी, कोळी, धनगर, बंजारी ह्या आहेत. जिल्ह्याच्या उत्तरेकडील भागांत गुजराती भाषा प्रचारांत असून, पश्चिम व दक्षिण भागांत मराठी भाषा वापरली जाते. कचेऱ्यांतून व शाळांतून मराठी भाषा चालते. खानदेशी लोक मराठी-गुजराती-नेमाडी-हिंदुस्तानी मिश्रित खानदेशी किंवा अहिराणी बोलीचा उपयोग करितात. खानदेश म्हणजे पूर्वीचा कन्ह किंवा कृष्ण देश

होय. अश्मक म्हणून ज्या प्रांताला महाभारतांत संबोधिलें आहे तो हाच होय असें कांहीं म्हणतात. खिस्तशकाच्या सुरुवातीला येथें अहीर राजे होते. अजिंठ्याच्या लेण्यांवरून येथें बौद्धसंस्कृति कांहीं काळ असावी असें दिसतें. अहिरांच्या नंतर क्रमानें आंध्र, क्षत्रप, चालुक्य, चव्हाण, मुसलमान, मराठे व इंग्रज अशा राजवटी ह्या भागावर झाल्या. बौद्ध, हेमाडपंती, मुसलमान वगैरे शिल्पकलेचे नमुने ह्या जिल्ह्यांत अनेक ठिकाणीं आहेत. चाळिसगांव तालुक्यांतील पितळखोऱ्यांत बौद्धकालीन चैत्य व विहार आहेत. पाटण येथील देवीच्या देवळा बाहेरील शिलालेख मराठी भाषेच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य यांचा नातू चांगदेव येथें राहत असे. त्याचें ज्योतिषशास्त्राचें विद्यापीठ येथें होतें.

**(१०) औरंगाबाद जिल्हा**:—हा जिल्हा हैदराबाद संस्थानांत असून त्याची लोकसंख्या सुमारे अकरा लाख आहे. यांत शेंकडा ८० लोक मराठी भाषा बोलतात. येथील मुख्य नदी गोदावरी आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ह्या जिल्ह्याचें महत्त्व विशेष आहे. खिस्ती शकापूर्वी ह्या जिल्ह्यांतील पैठण (पूर्वीचें प्रतिष्ठान) हें शहर फार महत्त्वाचें मानलें जाई. दुसरा पुलुमायी ह्या आंध्र राजाची येथें राजधानि होती, असें टॉलेमीनें लिहिलें आहे. या भागावर क्रमानें आंध्र, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव व मुसलमान अशा राजवटी झाल्या. कृष्णराज राष्ट्रकूटानें वेरूळ येथें खडक खोदवून प्रेक्षकांना आजहि स्तिमित करणारें प्रचंड कैलास लेणें आठव्या शतकांत तयार केलें. ह्या जिल्ह्यांतील वेरूळ, औरंगाबाद व अजिंठा येथील बुद्ध, जैन व ब्राम्हण पद्धतीचीं लेणीं प्रसिद्ध आहेत.

**(११) नांदेड जिल्हा**:—हा जिल्हा हैद्राबाद संस्थानांत असून येथील लोकसंख्या सुमारे नऊ लाख आहे. त्यापैकीं शेंकडा ७० च्यावर लोक मराठी बोलणारे आहेत. मुख्य नद्या गोदावरी व पैनगंगा ह्या असून तेथें तलाव फार आहेत. ह्या भागावर चालुक्य, यादव, खिलजी, मोंगल व निझाम अशा क्रमानें राजवटी झाल्या.

**(१२) बीड जिल्हा :**—हा जिल्हा हैद्राबाद संस्थानांत असून त्याची लोकसंख्या सुमारें आठ लाख आहे. त्यांपैकीं शेंकडा ८७ लोक मराठी बोलणारे आहेत. जिल्ह्याचें क्षेत्रफळ ६२५० चौ. मैल असून, बालाघाट, (उंचवट्याचा भाग) व पाइनघाट (सखल प्रदेश) असे त्याचे दोन भाग आहेत. गोदावरी ही मुख्य नदी असून, ती उत्तरेकडे वाहते. बीडचे पूर्वीचें नांव दुर्गावती असून, त्याचें पुढें चंपावतीनगर झालें. ह्या भागावर क्रमानें आंध्र, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, तघलख, बहामनी, निझामशाही, आदिलशाही, मोंगल व निझाम अशा राजवटीं झाल्या. महमद तघलखानें चंपावती नगरीचें नांव बीड ठेवलें. बीड येथील प्राचीन इमारती प्रेक्षणीय आहेत. जोगाईचें आंबे परळीवैजनाथ हीं दोन तीर्थस्थळें या जिल्ह्यांत आहेत.

**(१३) परभणी जिल्हा :**–हा जिल्हा हैदराबाद संस्थानांत असून, त्याचें क्षेत्रफळ ५१२७ चौ. मैल आहे. लोकसंख्या सुमारे नऊ लाख असून, त्यांत शेंकडा ८८ लोकसंख्या मराठी भाषा बोलणारे आहेत. ह्यांत सह्याद्रि व बालाघाट हे डोंगर आणि गोदावरी, पैनगंगा, पूर्णा, धूदना ह्या मुख्य नद्या आहेत. जिल्ह्याची हवा कोरडी व निरोगी असून, पावसाचें प्रमाण सरासरी ३४ इंच आहे. हा जिल्हा देवगिरीच्या यादवांकडे होता. पण चौदाव्या शतकाच्या आरंभीं अल्लाउद्दीन खिलजीनें तो जिंकला. तेव्हांपासून तो मुसलमानांच्या ताब्यांत आहे.

**(१४) उस्मानाबाद जिल्हा :**—हा जिल्हा हैदराबाद संस्थानांत असून, याचें क्षेत्रफळ ४०१० चौ. मैल आहे. लोकसंख्या सुमारे सात लाख असून, त्यांत शेंकडा ८४ लोक मराठी बोलणारे आहेत. उस्मानाबाद यास पूर्वी नलदुर्ग म्हणत असत. या भागावर यादव, खिलजी, बहामनी, मोंगल व निझाम अशा रियासती क्रमानें झाल्या. परेंडचा किल्ला, नलदुर्ग किल्ला, ओसवा तालुक्यांतील जाम मशीद, तुळजापुर येथील भवानीचें देवालय, थेर येथील बुद्धकालीन अवशेष, उस्मानाबाद जवळील जैन व वैष्णव लेणी हीं सर्व प्रेक्षणीय आहेत.

(१५) **नागपूर जिल्हा** :—हा मध्यप्रांतांतील मुख्य जिल्हा असून, ह्याचें क्षेत्रफळ ३८४० चौ. मैल व लोकसंख्या सुमारे दहा लाख आहे. त्यांतील लोकांची मुख्य भाषा मराठी असून, तिच्या खालोखाल येथें हिंदी, गोंडी, उर्दु व तेलगु भाषा बोलल्या जातात. ह्या जिल्ह्यांत सातपुड्याच्या कांहीं टेकड्या असून, मुख्य नद्या वैनगंगा, वर्धा, कन्हान व पेंच ह्या आहेत. या भागावर अठराव्या शतकापासून गोंड, भोंसले व इंग्रज अशा क्रमानें रियासती झाल्या. मध्यप्रांताच्या राजधानीचें शहर नागपूर हें असून, तेथें अनेक प्रकारच्या शिक्षणोपयोगी व इतर संस्था आहेत.

(१६) **वर्धा जिल्हा** :—हा वऱ्हाड मध्यप्रांतांतील एक जिल्हा असून, ह्याची लोकसंख्या सुमारे पांच लाख आहे. ह्या भागावर मोंगल, गोंड, भोंसले, निझाम व इंग्रज अशा क्रमानें रियासती झाल्या. येथील मुख्य नदी वर्धा असून, हवा कोरडी व निरोगी आहे.

(१७) **यवतमाळ जिल्हा**—हा वऱ्हाडांतील एक जिल्हा असून, त्याचें क्षेत्रफळ ५२०५ चौ. मैल व लोकसंख्या सुमारे आठ लाख आहे. येथील हवा कोरडी व निरोगी असून, पावसाचें मान ३३ इंच आहे. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण यवतमाळ असून तें १५०० फूट उंचीच्या पाइन घाटावर वसलें असल्यानें तेथील हवा थंड आहे. सांस्कृतिक दृष्ट्या यवतमाळ हें पुणें मुंबईच्या खालोखाल येतें.

(१८) **बुलढाणा जिल्हा**—वऱ्हाडांतील ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ३६६२ चौ. मैल असून, लोकसंख्या सुमारें आठ लाख आहे. या भागांत पावसाचें प्रमाण बरेंच असून, हवा थंड आहे. येथील मुख्य नद्या पाइनगंगा व पूर्णा ह्या आहेत लोणार व मेहकर येथें प्रेक्षणीय हेमाडपंती देवालयें असून, फत्तेखडा व रोहणखेड प्राचीन मशिदी आहेत. बुलढाणा गांव हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून, तें मलकापूर पासून २८ मैल दक्षिणेस आहे.

(१९) **बैतुल जिल्हा**—मध्यप्रांतांतील ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ३८७२ चौ. मैल असून, लोकसंख्या सुमारें चार लाख आहे. येथील

पावसाचें मान सरासरी ४५ इंच असून, हवा सामान्यता निरोगी आहे. मुख्य नद्या तापी, वर्धा, बेल, सांपना ह्या आहेत. येथें पूर्वी गोंड राजे राज्य करीत असत. पुढें मराठ्यांचें राज्य येथें होतें व सांप्रत इंग्रजांचें आहे. ह्या जिल्ह्यांतील खेर्ल्याचा किल्ला, मुक्तागिरी पहाडावरील देवालयें, मुलताई गांवांतील जुनीं देवालयें इत्यादि प्रेक्षणीय आहेत.

(२०) **अकोला जिल्हा**—हा जिल्हा वऱ्हाडांत असून, ह्याचें क्षेत्रफळ ४१११ चौ. मैल व लोकसंख्या सुमारें आठ लाख आहे. पावसाचें प्रमाण सुमारे ३० इंच असून, हवा उन्हाळ्यांत फारच उष्ण असते. येथील मुख्य नदी पूर्णा ही असून, जमीन काळी व सुपीक आहे. मुसलमान, मराठे व इंग्रज अशा येथें आतांपर्यंत रियासती झाल्या. नर्नाळा व बाळापूर येथील किल्ले, पातूर डोंगरांतील विहार व बार्शीटाकळी येथील हेमाडपंती देवालयें प्रेक्षणीय आहेत. अकोला हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून, मोर्णा नदी ह्या गांवांतून वाहते. हें गांव अकोलसिंग नांवाच्या कान्हेरी खेड्यांतील एका रजपुतानें बांधिलें असें म्हणतात.

(२१) **अमरावती जिल्हा**:—वऱ्हाडांतील ह्या जिल्ह्याचें क्षेत्रफळ ४७३३ चौ. मैल असून, लोकसंख्या सुमारे नऊ लाख आहे. ह्यांत वीस शहरें व दीड हजार खेडीं आहेत. येथील मुख्य नदी पूर्णा असून, पावसाचें मान बेताचें व हवा उष्ण आहे.

(२२) **चांदा जिल्हा**:—हा मध्यप्रांतांतील एक जिल्हा असून, त्याचें क्षेत्रफळ १०१५६ चौ. मैल व लोकसंख्या सुमारे सात लाख आहे. मुख्य नदी वैनगंगा ही असून ती शिवनी येथें वर्धेस मिळते. वैनगंगेच्या पश्चिमेकडील टेंकड्यांवर दाट जंगलें असून त्यांत वन्यपशु पुष्कळ आहेत. पावसाचें प्रमाण सरासरी ५० इंच असून, हवामान चांगलें आहे. वरोडा व बल्लारपूर येथें कोळशाच्या खाणी आहेत. येथें वाकाटक, गोंड, मराठे व इंग्रज अशा क्रमानें राजवटी आतांपर्यंत झाल्या.

(२३) **भंडारा जिल्हा**:—हा जिल्हा मध्यप्रांतांत असून, त्याची

लोकसंख्या सुमारे आठ लाख आहे. येथील मुख्य नदी वैनगंगा असून, पावसाचें प्रमाण ५५ इंच आहे. ह्या जिल्ह्यांत मँगेनीझ व लोखंड सांपडतें. हा भाग पूर्वी गवळीराजाच्या ताब्यांत होता. पुढें तो भोंसल्यांच्या अमलाखालीं आला व सध्यां तो इंग्रजांच्या ताब्यांत आहे.

(२४) गोवें :—ही पोर्तुगीझ वसाहत मुंबई इलाख्याच्या दक्षिणेकडे पश्चिम किनाऱ्यावर आहे. हिचें क्षेत्रफळ सुमारे तेराशे चौरस मैल असून, लोकसंख्या सुमारे सात लाख आहे. त्यांपैकीं तीन लाख ख्रिस्ती असन चार लाख हिंदु आहेत. सामान्य लोक मराठीची पोटभाषा कोंकणी ही बोलतात. सरकारी कामकाजाची व उच्च शिक्षण घेतलेल्यांची पोर्तुगीझ ही भाषा आहे. गोव्यांतील कवि व लेखक हे बव्हंशीं मराठींतूनच ग्रंथरचना करीत असतात. या प्रांतांतील सृष्टिसौंदर्य बहारीचें असून, लोक आदरातिथ्यांत निपुण आहेत. मंगेश व शांतादुर्गा हीं हिंदूंचीं देवळें प्रेक्षणीय असून, ख्रिस्ती देवळें बरीच प्राचीन व सुंदर शिल्पकृतीचीं आहेत. पाऊस सुमारे शंभर इंच पडतो व हवामान उष्ण आहे. कदंब, मुसलमान, डच व पोर्तुगीझ अशा क्रमानें येथें निरनिराळीं राज्यें झालीं. सध्यां हा प्रांत पोर्तुगालसरकारच्या ताब्यांत आहे. येथें गव्हर्नर-जनरल ऑफ पोर्तुगीझ इंडिया म्हणून एक अधिकारी असतो. त्याच्याकडे दिवाणी व लष्करी दोन्ही अधिकार असतात. नवें गोवें हें राजधानीचें शहर असून बंदरहि आहे. तें सुंदर, रेखीव व स्वच्छ आहे.

## ७

# कोठें काय होतें ?

राष्ट्रीय सभेनें मान्य केलेल्या तत्वाप्रमाणें हिंदुस्थानांत भाषावार प्रांतरचना झाल्यास महाराष्ट्र हा बऱ्याच अंशानीं स्वयपूर्ण असल्याचें आढळेल गुजरात किंवा गंगायमुनांच्या दुआबांतील प्रदेशांइतकी अत्यंत सुपीक अशी महाराष्ट्रांतील सर्वच्या सर्व भूमि नसली, तरी एकंदर महाराष्ट्राचा विचार केल्यास येथें धनधान्याला, दुधदुभत्याला, फळफळावळीला, कपडालत्याला, किंवा खनिजसंपत्तीला, फारशी उणीव पडेल अशी वस्तुस्थिति नाहीं. प्रस्तुत प्रकरणांत महाराष्ट्रांतील मुख्य पिकांची व उद्योगधंद्यांची जी माहिती दिली आहे, तिच्यावरून ही गोष्ट सहज समजेल.

महाराष्ट्रांतील मुख्य पीक ज्वारी, बाजरी, गहूं, भात, कापूस व ऊस यांचें आहे. कोंकणपट्टींतील रत्नागिरी, कुलाबा, व ठाणें या जिल्ह्यांत, मध्यप्रांतांतील भंडारा, रायपुर, विलासपूर, मंडला, व बालाघाट ह्या जिल्ह्यांत व मराठवाड्यांतील परभणी या जिल्ह्यांत पाऊस बराच पडत असल्यानें येथें भाताचें पीक चांगलें येतें. ज्वारी व बाजरीचें पीक देशावरील सर्व जिल्ह्यांत, मध्यप्रांत वऱ्हाडांत व मराठवाड्यांत सर्वत्र येतें. किंबहुना महाराष्ट्रीयांचें भाताच्या खालोखाल मुख्य अन्न ज्वारी व बाजरी हेंच आहे. गव्हाच्या पिकाला काळ्या ओलसर जमिनीची व कोरड्या थंड हवेची आवश्यकता असते. नाशिक, अहमदनगर, पूर्व व पश्चिम खानदेशांतील कांहीं भाग, नागपूर, बैतूल, चांदा, भंडारा, औरंगाबाद, नांदेड, बीड, परभणी व उस्मानाबाद ह्या जिल्ह्यांतून गव्हाचें पीक बरेंच

येतें. कापसास काळी कसदार जमीन, बेताचा पाऊस व उष्ण हवा यांची गरज असते. अशी स्थिति खानदेशांत, मध्यप्रांतांत आणि मराठवाड्यापैकीं नांदेड बीड व उस्मानाबाद ह्या जिल्ह्यांत असल्यानें येथें कापूस खूप उत्पन्न होतो. ऊस हें बागायतीचे पीक आहे. त्यास चांगली जमीन व भरपूर पाणी लागतें. अहमदनगर जिल्ह्यांत गोदावरी व प्रवरा ह्या नद्यांचे कालवे काढले असल्यानें तसेंच पुणे जिल्ह्यांत नीरा व मुठा ह्या नद्यांचे कालवे असल्यानें ह्या दोन्हीं जिल्ह्यांत हल्लीं लक्षावधि एकर जमीन उसाच्या लागवडीखालीं आहे. ह्या शिवाय सातारा, नाशिक, भंडारा, छिंदवाडा व बैतुल ह्याहि जिल्ह्यांत पुष्कळ ऊस तयार होतो. गूळ आणि साखरेचा विचार केला असतां महाराष्ट्र स्वयंपूर्ण मानायला फारशी हरकत नाहीं. गूळ व साखर बनविण्याचे कारखाने वालचंदनगर, टिळकनगर, हरिगांव, कान्हेगांव, साखरवाडी, रावळगांव, अकलूज, बोरगांव, पुणतांबे, बेलवंडी, लक्ष्मीवाडी, उगारखुर्द, कोल्हापूर व कित्तूर अशा चौदा ठिकाणीं आहेत. हरभऱ्याचें पीक सातारा, सोलापूर, नाशिक, अहमदनगर व नागपूर या जिल्ह्यांत दुय्यम प्रतीचें येते. सातारा, नगर, नाशिक, सोलापूर, सांगली, कऱ्हाड, निपाणी तसेंच खानदेशांत भुइमुगाचें पीक चांगलें येतें. हळद सातारा जिल्हा व ठाणें जिल्ह्याचा कांहीं भाग यांत होतें. मिरच्यांचें पीक अहमदनर, सातारा, पूर्व खानदेश, व नागपूर, या भागांत पुष्कळ येतें. बटाटे छिंदवाडा व पुणें जिल्ह्यांत होतात.

दुधदुभतें खानदेश, सातारा, बेळगांव व धारवाड ह्या भागांत चांगलें असून, ह्याच भागांतील तुपाची ख्यातिहि विशेष आहे.

फळांत कलमी आंबे व फणस हे मुख्यतः रत्नागिरी, कुलाबा व ठाणें जिल्ह्याच्या समुद्रालगतच्या भागांत विशेष होतात. केळीं ठाणें जिल्ह्यांत व पूर्व खानदेशांत चांगलीं होतात. काजू रत्नागिरी जिल्ह्यांत चांगल्या प्रकारचे तयार होतात. द्राक्षें नाशिक जिल्ह्यांत, अंजिरें पुणें जिल्ह्यांत, संत्री नागपूर विभागांत व मोसंबी खानदेशांत व पुणें जिल्ह्यांत होतात. नारळाचें उत्पन्न

रत्नागिरी, कुलाबा व ठाणें ह्या जिल्ह्यांत पुष्कळच आहे. सुपारी रत्नागिरी व कुलाबा जिल्ह्यांत थोड्या प्रमाणांत होते.

विड्याचीं पानें ठाणें जिल्ह्यांत, पुणें जिल्ह्यांत व मंडला, रामटेक ह्या मध्यप्रांतांतील विभागांत होतात. त्यांतल्या त्यांत मृदुता, रंग, आकार आणि सुवास ह्या दृष्टीनें रामटेकचें पान फारच प्रसिद्ध आहे. पुणें जिल्ह्यातील चरवलीचें पानहि स्वादाला चांगलें मानतात.

तांब्यापितळ्याचीं चांगल्या घाटाचीं भांडीं सांगली, कोल्हापूर, पुणें, नाशिक, नागपूर, ब्रह्मपुरी व भंडारा येथें होतात. सोन्याचे चांगल्या घडणीचे दागिने सांगली, कोल्हापूर, पुणें, मुंबई व नागपूर येथें बनतात. रत्नागिरी जिल्ह्यांतील विजयदुर्ग येथें ॲल्युमिनियमच्या बांगड्या व बटनें तयार होतात.

लोखंडी सामान तयार करण्याचे कारखाने सातारा, किर्लोस्करवाडी व मुंबई येथें आहेत. सातारा येथील कुपर कंपनीच्या कारखान्यांत लोखंडी नांगर, मोटा वगैरे सामान तयार होतें. किर्लोस्कर बंधू लिमिटेड यांच्या किर्लोस्करवाडी येथील कारखान्यांत लोखंडी नांगर, चरक, पंप, लहान एंजिनें, पलंग-खुर्च्या टेबलें वगैरे होतात. मुंबई येथील भायखळा आयर्न वर्क्स, नसरवानजी आयर्न वर्क्स, एडवर्ड आयर्न वर्क्स, जयंत आयर्न वर्क्स, ओरिएंटल आयर्न वर्क्स इत्यादि कारखान्यांतून लोखंडी सामान बरेच तयार होते.

कांचेच्या वस्तु बनविण्याचे कारखाने तळेगांव, ओगलेवाडी, नागपूर, कांदिवली व मुंबई येथें आहेत. महाराष्ट्रांतील पहिला कांचेचा कारखाना तळेगांव येथें इ. स. १९०८ मध्यें स्थापन झाला. ओगलेवाडी येथें कपबशा, बरण्या वगैरे जिन्नस तयार होतातच. पण त्याशिवाय सुप्रसिद्ध प्रभाकर कंदीलहि तयार होतात. कांदिवली येथील प्रचंड कारखान्यांत बांगड्या तयार होतात. मुंबई येथील कारखान्यांत वस्तु असेल त्या उष्णतामानांत ठेवणाऱ्या बरण्या, चंबु वगैरे तयार होतात. बांगड्यांचे दुसरे कारखानें ठाणें, पूर्व खानदेश, पुणें व धारवाड जिल्ह्यांत आहेत.

कापड विणण्याच्या गिरण्या महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं आहेत. त्यांपैकीं मुंबई, सोलापूर, नागपूर, पुणें, वर्धा, अमरावती, खामगांव, हिंगणघाट, आर्वी, धुळें, जळगाव, अमळनेर, यवतमाळ, पूलगांव, अकोला, औरंगाबाद, नांदेड, कोल्हापूर व सांगली हीं ठिकाणें मुख्य आहेत. याशिवाय हातमागावर कापड विणण्याचा धंदा येवलें, मालेगांव, संगमनेर, पुणें, पैठण, जालना, औरंगाबाद, नांदेड, भिवंडी, नागपूर, अहमदनगर येथें मोठ्या प्रमाणावर चालतो. येवल्यास कद, पीतांबर, पागोटीं वगैरे रेशमाचें व जरीचें काम चांगलें होतें. पुण्यास कद, पीतांबर, जरीचीं लुगडीं उत्कृष्ट तयार होतात. पैठण व जालना येथील रेशमी व सुती लुगडी उत्तम समजली जातात. औरंगाबाद येथें कशिद्याचें काम व किनखाप, मश्रु, हिमरूस वगैरे कापड चांगलें तयार होतें. नांदेड येथील मलमल व जरीचीं लुगडीं प्रसिद्ध आहेत. नागपूर येथेंहि जरीचीं व साधीं लुगडी फार उत्तम बनविलीं जातात. कोशाचें कापड चांद्यास चांगलें तयार होतें.

आगकाड्या बनविण्याचे कारखाने कुर्ला, बोरिवली, ठाणे, अंधेरी, सांताक्रुझ, अंबरनाथ बिलासपूर व नागपूर येथें आहेत. कागद बनविण्याची गिरणी पुण्याजवळ मुंढवा येथें आहे. मुंबईस गिरगांव पेपरमिल व डी. पदमजी पेपर मिल अशा दोन गिरण्या आहेत. औरंगाबाद जिल्ह्यांतील कागदीपुरा येथेंहि कागद चांगला तयार होतो.

देशी औषधें मोठ्या प्रमाणावर बनविण्याचे कारखाने पनवेल व चेंबूर येथें आहेत. याशिवाय आंजर्लें, मुरूड व मालगुंड येथेंहि आयुर्वेदिक औषधें थोड्या प्रमाणावर तयार होतात.

घड्याळें बनविण्याचे कारखाने मुंबईस दोन व पुण्यास एक आहे.

बोलपट तयार करण्याचा धंदा गेल्या पंधरावीस वर्षांपासून महाराष्ट्रांत सुरू झाला असून, त्यांत हजारो कलावंत व कारागीर काम करीत आहेत. मुख्य बोलपट निर्माण करणाऱ्या कंपन्या पुणें, मुंबई व कोल्हापूर येथें आहेत. सर्व हिंदुस्थानांत नामांकित अशा बोलपट कंपन्या महाराष्ट्रीयच

आहेत. इतकेंच नाहीं तर चित्रपट प्रथम निर्माण करण्याचा मानहि फाळके नांवाच्या महाराष्ट्रीयालाच योग्य तऱ्हेनें दिला जातो. प्रथम श्रेणीच्या दिग्दर्शकांत व्ही. शांताराम, दामले, फत्तेलाल, मास्टर विनायक, भालजी पेंढारकर इत्यादि महाराष्ट्रीयांचींच नांवें घेतलीं जातात.

महाराष्ट्राच्या समुद्रकिनाऱ्यावर रत्नागिरी, कुलाबा व ठाणें जिल्ह्यांत तसेंच मुंबई बेटांत बरेंच मीठ तयार होतें. मासळीचें उत्पन्नहि रत्नागिरी व कुलाबा जिल्ह्यांत तसेंच ठाणें जिल्ह्यांतील कांहीं भागांत चांगलें आहे.

खनिज संपत्तीच्या दृष्टीनें महाराष्ट्र सुरुपन्न नसला तरी फारसा असंपन्न आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. मॅंगेनीझ ह्या दुर्मिळ व बहुमोल धातूच्या खाणी नागपूर, भंडारा, बालाघाट व छिंदवाडा ह्या जिल्ह्यांत असून भंडारा, छिंदवाडा व चांदा येथें लोखंडहि सांपडतें. पश्चिम घाटांत महाबळेश्वराजवळ कांहीं ठिकाणीं बॉक्साइट नांवाची धातू मिळते.

कोचबिल्डिंग व मोटारकार रिपेअरिंगचे कारखाने मुंबई बेटांत एकवीस, मध्यप्रांत व वऱ्हाडांत चार व कोल्हापुरांत तीन आहेत. विजेचा पुरवठा करणारे कारखाने मुंबई बेटांत सहा, कुलाबा जिल्ह्यांत तीन, पुण्यांत एक, सोलापुरांत एक, ठाण्यांत एक, कोल्हापुरांत एक आणि मध्यप्रांत वऱ्हाडांत तीन आहेत. डबे व भांडीं वगैरे बनविण्याचे कारखाने मुंबई बेटांत अठरा, रत्नागिरींत एक, पुण्यांत दोन, सोलापूरांत एक आणि कोल्हापुरात तीन आहेत. रेल्वेचे दुरस्ती करण्याचे कारखाने मध्यप्रांत व वऱ्हाडांत दोन, मुंबई बेटांत नऊ, नाशिक जिल्ह्यांत चार, पूर्व-खानदेशांत तीन, पुणें जिल्ह्यांत चार, सोलापुर जिल्ह्यांत तीन व ठाणें जिल्ह्यांत तीन आहेत. नौका बांधणें व दुरस्त करण्याचे कारखानें मुंबई बेटांत दोन आहेत. याशिवाय रत्नागिरींतहि लहान गलबतें बांधलीं जातात. डाइंग (रंगविण्याचें) व ब्लीचिंग (धुण्याचे) कारखाने मुंबई बेटांत बावीस, सोलापुरांत एक व मध्यप्रांत व वऱ्हाडांत चार आहेत. गॅसचे कारखाने मुंबईत तीन व भुसावळ येथें एक आहे. तेलाच्या गिरण्या मुंबई बेटांत आठ,

पूर्व खानदेशांत दहा, पश्चिम खानदेशांत दहा, बेळगांव नाशिक-विजापूर येथें एकेक आणि मध्यप्रांत व वऱ्हाडांत सोळा आहेत. छापखाने मुंबई बेटांत पन्नास, ठाण्यांत एक, जळगांवांत एक, पुण्यांत वीस, आणि मध्यप्रांत व वऱ्हाडांत दहा आहेत.

जंगलाच्या उत्पन्नांत साग, खैर, ऐन, शाल, बाभुळ, शिरस, कोहन्ना, साज, अंजन इत्यादि झाडांचें लाकूड, तसेंच बेहडा, हिरडा, लाख इत्यादिचें मुख्य आहे. विंध्यपर्वत, सातपुडा व सह्याद्रि हींच जंगलांतील उत्पन्नाची मुख्य स्थानें होत.

महाराष्ट्रांत क्रिटेशियस व डेक्कन ट्रॅप नांवाचा दगड पश्चिमघाटांत व सह्याद्रीच्या रांगांतून मुबलक आढळतो. तज्ज्ञांच्या मतें ज्वालामुखीच्या रसापासून हा दगड तयार झाला असावा. धारवाडच्या बाजूस धारवाड नांवाचाच दगड आढळतो. हा दगड फार प्राचीन आहे. मध्यप्रांतांत गोंडवन नांवाचा दगड पुष्कळ आहे. हा फार ठिसूळ असल्यानें हवा व पावसाचा मारा यानें घासला जातो. मध्यप्रांतांत अनेक ठिकाणीं उतरंड रचून ठेवलेल्या गोल दगडाच्या टेंकड्या दिसतात त्या दगडाच्या या ठिसूळपणामुळेंच होय. ह्या टेकड्या बऱ्याच प्राचीन आहेत.

८

# महाराष्ट्रांतील प्राचीन शिल्पकला

महाराष्ट्रांतील प्राचीन शिल्पकलेकडे अजूनहि लोकांचें जावें तितकें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. हिंदुस्थानांत जर शिल्पकला कोठें असेल तर ती मद्रास प्रांतांतील हिंदूंच्या प्राचीन व प्रचंड देवालयांत व उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान राजघराण्यांतील स्त्रीपुरुषांच्या कबरींत किंवा मशिदींत आहे, अशी पुष्कळांची समजूत आहे. उत्तर हिंदुस्थानांतील ताजमहालसारख्या कबरीं किंवा दक्षिण हिंदुस्थानांतील मीनाक्षीच्या देवळासारखीं देवळें हीं शिल्पकलेचीं नितांत रमणीय स्थानें आहेत यांत शंकाच नाहीं. पण खुद्द महाराष्ट्रांचा विचार केला तरी अगदीं अभिमानास्पद वाटतील असे शिल्पकलेचे नमुने महाराष्ट्रांत जागोजागीं आहेत. वेरूळ, अजंठा, कऱ्हाड, कार्लें, भाजें, नाशिक, कान्हेरी, जोगेश्वरी व घारापुरी येथील डोंगरांतील लेणीं तसेंच नासिक, सिन्नर, बलसाणें, अंबरनाथ, संगमेश्वर, शिंगणापूर, वाडी, रत्नागिरी व कोल्हापूर येथील कांहीं जुनीं देवळें शिल्पकलेच्या दृष्टीनें अत्यंत प्रेक्षणीय आहेत.

वेरूळ गांव औरंगाबादेपासून वायव्येस १५ मैलांवर आहे. वेरूळचीं प्रसिद्ध लेणीं गांवापासून एक मैलावर देवगिरीच्या वाटेवर आहेत. बौद्ध, ब्राह्मणी व जैन अशीं एकंदर तीन प्रकारचीं लेणीं आहेत. बौद्ध लेणीं बारा आहेत; मध्यभागीं ब्राह्मणी सतरा आहेत व जैन पांच आहेत—त्यांस इंद्रसभा म्हणतात. बौद्धलेणीं इ. स. ४५० ते ७०० च्या काळांत कोरलीं असलीं पाहिजेत. यांपैकीं चैत्य व दोनताल, तीनताल हीं प्रेक्षणीय आहेत. ब्राह्मणी लेण्यांत दशावतार, रामेश्वर हीं महत्त्वाचीं आहेत. सर्वांत उत्कृष्ट

शिल्पकृतीचा नमुना कैलास लेण्यांत पाहावयास सांपडतो. स्वर्गात राहणारे देवहि तें पाहून आश्चर्य करतात, असें राष्ट्रकूटांच्या एका ताम्रपटांत त्याविषयीं म्हटलें आहे. हें भव्य शिवालय सबंधच्या सबंध एका डोंगरांत कोरलें असून त्याच्या तीन बाजूंना डोंगरांतच दोन मजली धर्मशाळेसारख्या इमारती कोरल्या आहेत. मुख्य कैलास लेणें खूप उंच असून, त्याच्या मध्यभागीं शिवलिंग आहे. हें लेणें कृष्णराज राष्ट्रकूटानें (इ. स. ७६०–७८३) बांधविलें. हिंदुस्थानांतील सर्व लेण्यांत शिल्पशास्त्रदृष्ट्या हें लेणें सर्वोत्कृष्ट आहे, असा अभिप्राय फर्ग्युसन व बर्जेससारख्या शिल्पशास्त्रज्ञांनीं दिला आहे. देवळाच्या खांबांवरील नक्षीकाम अत्यंत सुबक असून आंतील द्वारपाळांचे पुतळे सुमारे पंधरा फूट उंचीचे आहेत. शुचिता, भव्यता आणि उदात्तता यांचें मनोहर मिश्रण ह्या कैलास लेण्यांत झालें आहे असें पाहणाऱ्याला वाटतें.

अजंठ्याचीं लेणीं फर्दापूरपासून नैऋत्येस साडेतीन मैलांवर सह्याद्रि पर्वताच्या एका मुख्य खिंडीमध्यें आहेत. जळगाव, औरंगाबाद, पाचोरा इत्यादि ठिकाणांहून अजंठा गांवास जाता येतें. ह्युएनत्संग ह्या चिनी प्रवाशाच्या वर्णनावरून हीं लेणीं म्हणजे बौद्धधर्मीयांचें तीर्थयात्रेचें स्थान असावेंसें दिसतें. बौद्धधर्माच्या पाडावानंतर मात्र ह्या लेण्यांकडे लोकांचें दुर्लक्ष झालेलें दिसतें. सर जेम्स अलेक्झांडर ह्यांचें लक्ष ह्या लेण्यांकडे इ. स. १८२१ मध्यें गेलें. तीं पाहून ते तर अगदीं थक्क झाले. हल्लीं हीं सर्व लेणीं साफ करण्यांत आलीं असून प्रकाशाचीहि चांगली व्यवस्था करण्यांत आली आहे. एकंदर लेणीं एकोणतीस असून, त्यांपैकीं बहुतेक चांगल्या स्थितींत आहेत. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकापर्यंत निरनिराळ्या काळीं हीं खोदलीं गेलीं असावीत. कांहीं लेण्यांतून बुद्धाच्या मूर्ती आहेत व बहुतेक सर्व लेण्यांतील खांबांवर नक्षीकाम असून भिंतींवर रंगीत चित्रें काढण्यांत आलीं आहेत. हिंदुस्थानांतील तिसऱ्यापासून आठव्या शतकापर्यंतच्या लोकांची राहणी ह्या चित्रांवरून चांगली समजते. चित्रकलेच्या दृष्टीनें पाहिलें असतां हीं चित्रें अनुपम असून इतकीं भावनादर्शक चित्रें जगांत क्वचित्‌च

आढळतील असें ग्रिफिथ वगैरेंचें म्हणणें आहे. कांहीं लेणीं पैठणच्या शातकर्णी राजांच्या कारकीर्दीतील असून, कांहीं पुलकेशी चालुक्याच्या काळांतील आहेत.

आगाशिवाचीं लेणीं कऱ्हाडच्या नैऋत्येस पांच मैलांवर आहेत. हीं एकंदर चौसष्ट असून त्याचे तीन गट आहेत. आकारानें हीं लेणीं फार लहान असून त्यांतील चैत्य फारच साधे आहेत. या लेण्यांतून चोहोंकडे निजण्याकरितां तयार केलेले दगडाचे लांब व अरुंद ओटे दिसतात. त्यांच्या साधेपणावरून हीं लेणीं खिस्तीशकापूर्वीचीं असावींत असें दिसतें.

कार्ले येथील प्रसिद्ध लेणीं जी. आय. पी. रेल्वेच्या मळवली स्टेशना· पासून पूर्वेस तीन मैलांवर आहेत. हीं इ. स. पूर्वी सुमारे ८० वर्षांच्या काळांत कोरलीं गेलीं असावींत असें दिसतें. मुख्य चैत्याच्या आंतील बाजूच्या खांबांवरील तसेंच स्तूपावरील नक्षीकाम फारच मनोवेधक आहे. खांबांच्या वरच्या बाजूस सुंदर मूर्ती कोरलेल्या आहेत. चैत्यापासून जवळच दुमजली सात खोल्यांची रांग आहे.

मळवली स्टेशनापासून दक्षिणेस दोन मैलांवर भाजें नांवाचें एक लहानसें खेडें असून, त्याच्या जवळील डोंगरावर सुमारे अठरा लेणीं आहेत. हीं बौद्ध लोकांनीं इ. स. पूर्वी पहिल्या व दुसऱ्या शतकांत कोरिलीं असावींत असें म्हणतात. कांहीं लेण्यांत चैत्य अथवा प्रार्थनागृहें असून, कांहींत नुसते विहार आहेत. येथील लेण्यांच्या बाहेरच्या बाजूस आकृति कोरिलेल्या आहेत. आज दोन हजार वर्षें झालीं हीं लेणीं ऊन, वारा, पाऊस सोसून टिकून राहिलीं आहेत, ही एकच गोष्ट त्यांच्या पायाशुद्ध शिल्पकलेची साक्ष देत आहे.

नाशिक शहरापासून पांच मैलांवर एका टेकडीवर बौद्ध लेणीं आहेत. त्यांस लोक पांडव लेणीं या नांवानें ओळखतात ! हीं अत्यंत बळकट अशा खडकांत कोरिलीं असल्यामुळें त्यांवरील शिलालेख दोन हजार वर्षांच्या कालानंतरहि शाबूत आहेत. हीं लेणीं चोवीस असून, त्यांपैकीं एक चैत्य

असून बाकीचे राहण्याचे विहार आहेत. लेण्यांतील भिंतींत कोरिलेल्या मूर्ती व खोदीव काम प्रेक्षणीय आहे. पण या सर्वांपेक्षा प्रस्तुत लेण्यांची प्रसिद्धी त्यांतील ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या अशा शिलालेखांमुळें आहे. बहुतेक शिलालेख शातकर्णी व क्षत्रप राजांच्या काळांतील आहेत.

कान्हेरी येथील लेणीं बी. बी. सी. आय. रेल्वेच्या बोरीवली स्टेशनाच्या पूर्वेस पांच मैलावर एकांतस्थानीं डोंगरांत कोरिलेलीं आहेत. ह्यांची संख्या एकशेंदोन आहे. येथें बौद्धाची मोठी वसाहतच असावी असें यांवरून दिसतें. बुद्धभिक्षुंकरितां राहण्याच्या खोल्या, प्रार्थनेच्या जागा, सभागृहें वगैरे आहेत. लेण्यांतील शिलालेखावरून तीं दुसऱ्या शतकात तयार झालीं असावींत. ठिकठिकाणीं उत्तम कोरीव काम असून, क्रमांक तीनच्या चैत्याबाहेर पंचवीस फूट उंचीच्या दोन स्त्रीपुरुषाच्या प्रचंड मूर्ती आहेत. त्या चैत्याच्या बाहेरील शिलालेखांवरून त्याचे काम शातकर्णी गौतमीपुत्र याच्या कारकीर्दीत (इ. स. १८०) गजसेन व गजमित्र नांवाच्या दोन भावांनीं केलें असें दिसतें; व त्याच्याच मूर्ती त्यांच्या पत्नींसह बाहेर कोरिल्या आहेत असें म्हणतात.

जोगेश्वरीचें लेणें बी. बी. सी. आय. रेल्वेच्या जोगेश्वरी स्टेशनापासून आग्नेय दिशेस अर्ध्या मैलावर आहे. हें एकच असलें तरी भव्यपणांत तें कैलास लेण्याच्या खालोखाल महत्त्वाचें आहे. एका दालनांत शिवाची मूर्ति ध्यानस्थ स्थितींत असून, दुसऱ्यांत शिव तांडव करीत आहे असें चित्र कोरलें आहे. हें लेणें ८ व्या शतकांत हिंदुनीं कोरिलें असावें.

घारापुरी येथील लेणीं हिंदूंनीं इ. स. ८ व्या शतकांत बांधिलीं. हीं मुंबईच्या पूर्वेस सात मैलावर एलिफंटा नांवाच्या बेटांत आहेत. बेटाचें जुनें नांव घारापुरी असूनहि, बेटाच्या खडकात मोठा हत्ति कोरिलेला पाहून पोर्तुगीझ लोकांनीं त्याचें नांव एलिफंटा असें ठेविलें. लेणीं एकंदर पांच असून, तीं बेटाच्या पश्चिमेकडील एका टेकडींत कोरिलीं आहेत. मुख्य लेण्यांत त्रिमूर्ति, शंकर-पार्वतींच्या लग्नसमारंभाचा देखावा, शंकराचें तांडव,

अर्धनारी नटेश्वर, गणपति, शंकराचे गण, द्वारपाळ वगैरेंच्या भव्य मूर्ति कोरिलेल्या असून, त्या अत्यंत सुबक आहेत. सर्वांत त्रिमूर्तीची भव्य मूर्ति प्राचीन खोदकामाचा एक उत्कृष्ट नमुना ठरेल अशी आहे.

लेण्यांतील कैलासासारखीं देवळे वगळल्यास महाराष्ट्रांतील देवळें मद्रासेकडील देवळासारखी भव्य आहेत असें म्हणवत नाहीं. तरीपण महाराष्ट्रांतील कांहीं मंदिरें खोदकाम किंवा नक्षीकामाच्या दृष्टीनें अत्यंत प्रेक्षणीय असून, कांहींतील मूर्ति मनोहर आहेत. नाशिक येथील नारोशंकराचें देऊळ शिल्पकलेच्या दृष्टीनें फार प्रसिद्ध आहे. देवळाची वरची बाजू व शिखर ह्यांवर सुंदर कोरीव काम केलेले आहे. मुख्य दरवाज्यावर कमानीवर व देवळाच्या बाहेरच्या भिंतींवर लहान मूर्ति मोठ्या कुशलतेनें कोरिल्या आहेत. पश्चिम तटावरील घुमटांत एक मोठी घंटा आहे. हें देवालय नासिक जिल्ह्यांतील मालेगांवचे प्रसिद्ध सरदार नारोशंकर राजेबहादूर यांनीं इ.स. १७४७ मध्यें सुमारें १८ लाख रु. खर्चून बांधिलें. नाशिक जवळील पंचवटींतील काळ्या रामाचें देवालयांतील राम लक्ष्मण आणि सीता यांच्या मूर्ति काळ्या पाषाणाच्या असून, त्या फारच सुंदर आहेत. सिन्नर येथील गोंदेश्वराचें देऊळ शिल्पकलेचा उत्तम नमुना म्हणून प्रसिद्ध आहे. हं देऊळ ८०० वर्षांपूर्वी यादव वंशांतील रावगोविंद नांवाच्या गवळी राजानें बांधिलें. २२३ फूट लांब, १९४ फूट रुंद व ७ फूट उंच अशा दगडी चौथऱ्यावर हें मध्यभागीं असून त्याच्या चार कोपऱ्यांस विष्णु, गणपति, सूर्य व देवी ह्यांचीं चार लहान देवळें आहेत. मुख्य देवळाचें काम हेमाडपंती पद्धतीचें असून, देवळाच्या आंत तसेंच बाहेर उत्तम प्रकारचें कोरीव काम केलेलें आहे. पश्चिम खानदेशांतील बलसाणें गांवीं हेमाडपंतानें बांधलेलें एक उत्कृष्ट देवालय आहे. हेमाडपंत यादववंशांतील रामदेवराव राजाच्या पदरीं प्रधान म्हणून होता. ह्या देवालयाच्या आंतील व बाहेरील खांबांवर हात जोडलेल्या निरनिराळ्या सुंदर मूर्ती कोरिलेल्या आहेत. देवालयाच्या दगडी छतावर आंतील बाजूस अनेक पौराणिक देखावे कुश-

लतेनें कोरिले आहेत. देवळाच्या गाभाऱ्यांत शिवलिंग असून मागच्या बाजूस शंकराची मूर्ति कोरिलेली आहे. हें देऊळ सहाशे-सातशे वर्षांपूर्वींचें असून ते अद्यापि सुस्थितींत आहे.

जी. आय. पी. रेल्वेच्या अंबरनाथ स्टेशनापासून एक मैलावर असलेलें अंबरनाथाचें महादेवाचें मंदीर अत्यंत प्रेक्षणीय आहे. इ. स. १०५० मध्यें तें बांधिलें असावें असें तेथील शिलालेखावरून समजतें. देवळाची लांबी ८४ फूट असून रुंदी ६० फूट आहे. बांधणी हेमाडपंती पद्धतीची असून, देवळाच्या बाहेरच्या व आंतल्या बाजूस फारच सुंदर कोरीव काम केलेलें आहे. ठिकठिकाणीं निरनिराळ्या देवता, सिंह, हत्ती, नर्तकी, बजवय्ये, इत्यादिकांचीं चित्रें कोरिलीं आहेत. दगडावर कोरलेली नक्षी ही तर इतकी सुबक, प्रमाणशीर व भूमितीच्या निरनिराळ्या आकृतींनीं रचिलेली आहे कीं, युरोपियन शिल्पशास्त्रज्ञ तिची मुक्त कंठानें प्रशंसा करितात. देवळांतील गणपति, नंदी, देवी, ह्यांच्या मूर्ती फुटलेल्या असून मुख्य शिवलिंगासहि मोठी भेग गेलेली आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील संगमेश्वर बंदरांत कर्णेश्वराचें महादेवाचें देऊळ असून तें सातव्या शतकांत चालुक्य वंशांतील कर्ण राजानें बांधिलें असें म्हणतात. देवळाचें काम सामान्यतः साधेंच आहे; पण आंतील व बाहेरील खांबांवर सुबक नक्षीकाम केलेलें असून, भिंतीवर देवादिकांच्या सुंदर मूर्ती कोरलेल्या आहेत.



१

# महाराष्ट्रीयांची कलोपासना

संगीतकलेकडे महाराष्ट्रीयांनीं फार प्राचीन कालापासून चांगलें लक्ष दिलेलें दिसतें. प्राचीन हिंदी संगीतशास्त्रज्ञांत शारंगदेवाचें नांव सर्वांत श्रेष्ठ समजलें जातें. याच्याबद्दल हिंदी संगीतशास्त्रज्ञांत संपूर्ण आदर वास करीत आहे हा शारंगदेव तेराव्या शतकांत (इ. स. १२१० ते १२४७) देवगिरीच्या यादवाच्या दरबारीं राजगायक म्हणून होता. यादवांच्या साम्राज्याचा विस्तार दक्षिणेंत कावेरीनदीपर्यंत पसरलेला होता आणि त्यामुळें उत्तरेकडील व दक्षिणेकडील अशा दोन्ही संगीतपद्धतींशीं शारंगदेवाचा परिचय झाला असावा. ह्या शारंगदेवानें संगीतरत्नाकर नांवाचा रसिकमान्य ग्रंथ लिहून त्यात त्यानें त्याच्या काळांत प्रचलित असलेल्या संगीताबद्दल विस्तृत विवेचन केलें आहे. शारंगदेवानंतर पुंडरीक विठ्ठल याचें नांव घेतलें पाहिजे. हा सोळाव्या शतकांत बऱ्हाणपूर येथें होऊन गेला. त्याला अकबरानें इ. स. १५९९ मध्यें दिल्हीस बोलावून नेलें होतें. पुंडरीकानें षड्रागचंद्रोदय, रागमाला, रागमंजरी आणि नर्तननिर्णय हे चार ग्रंथ लिहिले. पुंडरीकानें उत्तर व दक्षिण, या दोन्ही संगीतपद्धतींचा अभ्यास केला. परंतु आपल्या ग्रंथांत त्यानें दक्षिणेंतील शुद्धरागपद्धति स्वीकारली आणि उत्तरेकडील बऱ्याच रागांचें वर्णन केलें. पेशव्यांच्या कारकीर्दींत संगीतकलेला चांगला आश्रय मिळाला. विशेषतः सवाई माधवराव व दुसरा बाजीराव ह्यांच्या राज्यांत बरेच गवई होऊन गेले. ब्रिटिश अमदानींत युरोपियन अधिकाऱ्यांना भारतीय संगीत कळत नसल्यानें, महाराष्ट्रीय संस्थानांतून संगीतकलेला आश्रय शोधावा लागला. त्यांत ग्वाल्हेर, इंदूर,

बडोदें, कोल्हापूर, इचलकरंजी, सांगली ह्या संस्थानांतून नामांकित संगीतज्ञ निर्माण झाले. अशांत फैजमहंमद, मौलाबक्ष, फैयाजखान, अल्लादियाखां, हैदरखां, वझेबुवा, बखलेबुवा हीं नांवे श्रेष्ठ दर्ज्याच्या गवयांचीं म्हणून सहज सांगतां येतील. संगीतशास्त्राच्या प्रगतीप्रीत्यर्थ भारतीय संगीत परिषदेच्या ज्या बैठकी मधून मधून भरत असतात, त्यांपैकीं पाहिली परिषद् इ. स. १९१६ मध्यें कै. श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड ह्यांच्या आश्रयाखालीं भरविण्यांत आली. पुढें १९१९ सालीं ऑलइंडिया म्यूझिक ॲकेडेमी स्थापन झाली. ह्या संस्थेला चतुरपंडित नारायण भातखडे (इ. स. १८६० ते १९३६) यांचें विशेष साहाय्य झाले. संगीत क्षेत्रांत कै. भातखंडे ह्यांनीं अभूतपूर्व कामगिरी केली आहे. मोठ्या कष्टानें त्यांनीं संगित विद्या प्राप्त करून, आपलें सर्व आयुष्य त्या विद्येच्या प्रसारार्थ त्यांनीं वेचिले. संगित विद्येला नियमबद्धता व एकसूत्र पणा आणण्याचा त्यांनीं यशस्वी प्रयत्न केला. हिंदुस्थानी संगीतपद्धति विशद करण्याच्या हेतूनें त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले. आज त्यांचे ग्रंथ महाराष्ट्रांतच नव्हे तर महाराष्ट्राबाहेरहि प्रयत्नपूर्वक अभ्यासिले जात आहेत, पंडित विष्णु दिगंवर पलुस्कर ह्यानींहि मुंबई येथें इ.स. १९०१ मध्यें गांधर्व महाविद्यालयाची स्थापना करून संगीतकलेच्या पायाशुद्ध व संपूर्ण अभ्यासाची सोय केली. सुप्रसिद्ध संगीतज्ञ पंडित ओंकारनाथ हे पंडित विष्णु दिंगबराचेच शिष्य होत. त्याच्या शिवाय विनायकबुआ पटवर्धन, नारायणराव व्यास इत्यादि त्यांचे शिष्यहि आपल्या गुरूच्या विद्येचा संगीत शाळा काढून व अन्य रीतीनें खूप प्रसार करीत आहेत. अल्लादिया-खांसाहेब व त्यांचे बंधु हैदरखांसाहेब याच्या शिष्या लक्ष्मीबाई जाधव, मोघुबाई कुर्डीकर, केसरबाई केरकर ह्या आपल्या गुरूच्या लौकिकाला साजेल अशा श्रेष्ठ संगीताचा व्यासंग व प्रसार करीत आहेत. रंगभूमीवर उच्च श्रेणीचे गायक म्हणून नांवलौकिक मिळविला अशांत भाउराव कोल्हटकर, बालगंधर्व उर्फ नारायणराव राजहंस, केशवराव भोंसलें, पेंढार-

कर, कृष्णा मास्तर, अशांचीं नांवें प्रामुख्यानें घेतलीं जातील. ह्या मंडळींनीं आधींच संगीतप्रेमी असलेल्या महाराष्ट्रीयांना संगीताचें विशेष वेड लाविलें.

संगीतकलेप्रमाणेंच नृत्यकलेकडेदेखील महाराष्ट्रीयांचें लक्ष आहे. मात्र ह्या कलेचा विकास सर्व महाराष्ट्रांत सारखाच नसून, गोवें प्रांतांत तो विशेषेंकरून आहे. देवदासीची प्रथा त्या प्रांतांत असून, ह्या स्त्रिया देवासमोर उत्तम नृत्य करितात. खंडोबाला ज्या मुरळ्या म्हणून वाहिल्या जातात, त्या थोडेफार नृत्य जाणतात. तमाशाची प्रथा गेल्या दीडशेवर्षांपासून महाराष्ट्रांत चालू असून, यातहि कांहीं स्त्रिया नृत्य करितात. समाजांत सभ्य समजला गेलेला वर्ग, तमाशे पाहायला सामान्यपणें जात नसल्यानें, तमाशांतील नृत्य हें अजून खालच्या थरावरच आहे. अगदीं अलीकडे बोलपटांत नृत्याचा समावेश होऊ लागल्यापासून, सभ्य स्त्रीपुरुषांचें लक्ष त्याच्याकडे वेधले जाऊन अधिक स्त्रिया नृत्यकलेचा अभ्यास करीत आहेत.

संगीत व नृत्य ह्या कलांच्या बरोबरीनें वागणाऱ्या अभिनय किंवा नाट्यकलेची उपासना महाराष्ट्रीय मंडळी गेल्या तीनशे वर्षांपासून करीत आहेत. मुसलमानी अंमलांत ह्या कलेकडे मराठ्याना लक्ष साहजिकच देतां आलें नाहीं. शिवाय त्या वेळच्या धर्मकल्पनांप्राणें नटाचें तोंड बघणें, पुरुषानें स्त्रीवेष घेणें इत्यादि गोष्टी त्याज्य समजल्या गेल्या होत्या. परंतु शिवशाहीच्या व विशेषतः नंतरच्या काळांत अभिनय व नाट्य या कलांकडे लोकांनीं चांगलेंच लक्ष दिलेलें आढळतें. तंजावर येथे भोसल्यांचें जें घराणें होतें, त्याच्या आश्रयाखालीं नाट्यकला चांगलीच जीव धरून होती, असें उपलब्ध झालेल्या नाटकाच्या हस्तलिखितांवरून दिसतें पेशवाईत तमाशांना उदार आश्रय मिळत असल्यानें, अभिनयकला चांगलीच फोफावली. परंतु तिचा दर्जा कांहीं त्या काळांत वाढलेला नव्हता. सांगलीचे अधिपति अप्पासाहेब पटवर्धन ह्यांनीं अभिनयकलेला उत्तम आश्रय देऊन, आपल्या पदरच्या विष्णुदास भाव्यांना नाटकें लिहून तीं रंगभूमीवर आणण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणें इ. स. १८४३ सालीं विष्णुदास भावे ह्यांच्या नाटक

मंडळीनें सीतास्वयंवराचें नाटक श्रीमंतांना प्रथम करून दाखविलें. विष्णुदासांच्या मंडळीनें पुढें पुणें, मुंबई इत्यादि अनेक ठिकाणीं आपलीं नाटकें करून दाखविलीं. ह्या नाटकांतील नटांचीं कामें त्यावेळच्या मानानें बरीं होत, असें तत्कालीन वर्तमानपत्रांवरून समजतें. पुणेंकर, कोल्हापूरकर, इचलकरंजीकर अशा निरनिराळ्या मंडळ्यानीं सुरुवातीला नाट्यकलेचा बराच प्रसार केला. पुढें इ. स. १८८० मध्यें अण्णासाहेब किर्लोस्करांनीं किर्लोस्कर संगीत मंडळीची स्थापना करून शाकुंतल, सौभद्र, रामराज्यवियोग इत्यादि श्रेष्ठ दर्जाचीं नाटकें श्रेष्ठ दर्जाच्या नटाकडून करून दाखविली. भाऊराव कोल्हटकर, मोरोबा वाघुलीकर, बाकभोवा नाटेकर व स्वतः अण्णासाहेब ह्यांचा अभिनय उत्तम होत असे. यापुढील चाळीस पन्नास वर्षांच्या काळांत महाराष्ट्रीयांनीं अभिनय व नाट्य ह्या कलाची जितकी उपासना केली, तितकी इतरांनीं क्वचित्च केली असेल. ह्या पन्नास वर्षांच्या काळांत, सुमारे पन्नास पहिल्या-दुसऱ्या वर्गांत जमा होऊ शकतील अशा नाटक मंडळ्यांनीं, सुमारे दीड हजार नाटकें महाराष्ट्ररंगभूमीवर करून दाखविलीं, ही एकच गोष्ट आपलें लक्ष ह्या कलेकडे किती होतें, हें सांगायला पुरेशी आहे. स्वदेशहितचिंतक, चित्ताकर्षक, किर्लोस्कर संगीत, शाहूनगरवासी, महाराष्ट्र, ललितकलादर्श, गंधर्व, बेळगांवकर, नाट्यकलाप्रसारक, नाट्यकला प्रवर्तक, नूतन संगीत, बालमोहन, शिवराज संगीत, नाट्यमन्वंतर, नाट्यनिकेतन इत्यादि अनेक नाटक मंडळ्यांच्या रंगभूमीवर अनेक श्रेष्ठ दर्जाच्या नटांनीं अभिनयकलेचा उत्तमोत्तम विलास महाराष्ट्रीयांना दाखविला आहे. शृंगार, वीर, हास्य, करुण, शांत इत्यादि विविध रसांचा आविर्भाव आमच्या नटांनीं केवळ अनुपमेय असा करून दाखविला आहे. अभिनय व नाट्य ह्या दोन्ही दृष्टींनीं पाहतां मराठी रंगभूमीचें आजवरचें कार्य अभिमानास्पद असेंच झालें आहे. महाराष्ट्रांत आतांपर्यंत शेंकडो उत्तम नट होऊन गेले. अशांत नांवें कितीकांची सांगणार ? पण नमुन्यादाखल कांहीं नटांचा उल्लेख करितों. गणपतराव जोशी हे फारच

श्रेष्ठ दर्ज्याचे नट होऊन गेले. वीर, शांत व करुण ह्या रसांचा आविर्भाव ते उत्तम करीत असत. गणपतराव बोडस, भांडारकर व दिनकर कामण्णा हे हास्यरस कमालीचा सजवीत. नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व हे म्हणजे मूर्तिमत रसच आहेत. शृंगार व करुण ह्या रसाच्या त्यांच्या भूमिका केवळ अपूर्व अशा होत. महाराष्ट्र नाटक मंडळींतील केशवराव दाते व पोतनीस ह्यांच्याहि भूमिका उत्कृष्ट होत असत. रंगभूमिप्रमाणें गेल्या वीस वर्षांत रजतपटावर देखील कांहीं महाराष्ट्रीय नटांनीं व नटींनीं श्रेष्ठ अभिनय केला आहे. अशा नामवत नटनटींत बाबूराव पेंढारकर, मास्टर विनायक, साळवी, दामुअण्णा मालवणकर, दुर्गा खोटे, लीला चिटणीस, वनमाला, शांता आपटे इत्यादिकांचा प्रामुख्यानें उल्लेख करितां येईल.

महाराष्ट्रीय चित्रकलेचा वारसा फार प्राचीन व प्रसिद्ध असा आहे. मुसलमानी अंमलांत आमची नाट्यकला जशी मागें पडली, तशीच चित्र-कला देखील मागें पडली असावी. अजंठ्याच्या लेण्यांत भिंतीवर जीं रंगीत सुंदर चित्रें काढण्यांत आलीं आहेत, तीं महाराष्ट्रीय चित्रकलेच्या उपलब्ध नमुन्यांपैकीं आद्य होत. अजंठ्याचीं लेणीं इ. स. पूर्वी पहिल्या शतकापासून इ. स. च्या सातव्या शतकापर्यंतच्या काळांत खोदण्यांत आलीं. हीं चित्रेंहि त्याच सुमाराचीं मानलीं जातात. खरखरीत असलेल्या भिंतीवर भाताचा कुंडा व तागाचे वगैरे तंतु मिसळून चिकट केलेल्या गिलाव्याचा थर देऊन त्यावर हीं चित्रें काढिलीं आहेत. अजिंठा लेण्यांतील चित्रें किती भावपूर्ण असतात हे पुढील एका देखाव्याच्या वर्णनावरून दिसून येईल.

मृत्युशय्येवर राजकन्या पडली असून, तिचे डोळे अर्धवट मिटले आहेत, मान सैल पडलेली आहे व गात्रें शिथिल झालीं आहेत. एका दासीनें तिला आधार दिला आहे व दुसरी तिचा हात आपल्या हातांत घेऊन मोठ्या कळवळ्यानें तिच्या तोंडाकडे पाहात आहे. आणखी एक

दासी मागें उभी राहून राजकन्येला वारा घालीत आहे व डाव्या बाजूस दोन पुरुष अतिशय दुःखित मुद्रेने पाहात आहेत. खालीं जमिनीवर इतर नातेवाईक निराश स्थितींत बसले आहेत. त्यांपैकीं एक स्त्री तर तोंडावर हात धरून ओक्साबोक्सी रडत आहे. हा हृदयभेदक देखावा कलेच्या इतिहासांत सर्वश्रेष्ठ असल्याबद्दल पाश्चात्य पंडितहि ग्वाही देतात. फ्लॉरेंटाईन कला यापेक्षां ज्यास्त सरस चित्र रेखाटील व व्हेनिशियन कला यांतील रंगावर ताण करील; पण यांतील भावदर्शन मात्र कोणालाच साधणार नाहीं असें ग्रिफिथ साहेब आपल्या रिपोर्टांत म्हणतात.

भिंतीवर चित्रें काढण्याची ही कला महाराष्ट्रांत कित्येक शतकें प्रचारांत होती. 'खणोखणी तसबिरा काढिल्या' ह्या परशुराम शाहीराच्या म्हणण्याप्रमाणें श्रीमंताच्या वाड्यांतून भिंतीवर चित्रे काढण्याची चाल स्पष्ट दिसते. आजहि सरदारांच्या जुन्या वाड्यातून असलीं चित्रें अनेक ठिकाणीं पाहावयास सांपडतात. बडोद्यांत तांबेकर व शिर्के ह्यांच्या वाड्यांत भिंतीवर काढलेलीं जुनीं चित्रे प्रस्तुत लेखकानें बघितलीं असून तीं सुदर असल्या-बद्दलची त्याची खात्री आहे. भिंतीवरील चित्रांप्रमाणेच पौराणिक आख्यान-पर पोथ्यांतून चित्रें काढण्याची चालहि महाराष्ट्रांत होती. अशा चित्रां-पैकीं कांहीं पुण्याच्या भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या ताब्यांत आहेत.

इंग्रजांच्या सान्निध्यांत आपण आल्यापासून आपल्या चित्रकलेवर पाश्चिमात्य चित्रकलेचा ठसा उमटल्यावांचून राहिलेला नाहीं. आपल्या इकडचे चित्रकार पौर्वात्य व पाश्चिमात्य चित्रकलांचा समन्वय करून सुंदर चित्रें काढीत असतात. राजा रविवर्मा ह्यांचीं बडोद्याच्या लक्ष्मीविलास राजवाड्यांत जीं चित्रें ठेवण्यांत आलीं आहेत तीं अशा धर्तीचीं आहेत. महाराष्ट्रीय आधुनिक चित्रकारांत ज्यांना पहिल्या श्रेणीचे चित्रकार म्हणता येईल अशांत रावबहादुर धुरंधर, गणपतराव लाड, बाबुराव पेंटर, देऊसकर, पूरम, हळदणकर इत्यादिकांचा उल्लेख करतां येईल.

चित्रकलेप्रमाणेंच शिल्पकलेकडेदेखील आमच्या कलावंतांचें लक्ष आहे.

वेरूळ येथील कैलासलेणें हें महाराष्ट्रीय शिल्पकलेचा उत्तम नमुना म्हणून सर्वकाळ मानला जाईल. पूर्वी कला ही धार्मिक गोष्टींत व्यक्त होत असल्याकारणानें, आमच्या प्राचीन शिल्पकलेला देवळांच्याद्वारें व मूर्तींच्या द्वारें कसें प्रगट व्हावें लागलें ह्याचा उल्लेख एका स्वतंत्र प्रकरणांत केला असल्यानें त्याचा येथें ऊहापोह नको. आधुनिक काळांतील आपल्या शिल्पकारात रघुनाथराव फडके, बाबुराव पेंटर, बाबुराव कोल्हटकर, वि. पां. करमरकर, तालीम, इत्यादि समजले जातात व ह्यांनीं निर्माण केलेले पुतळे व मूर्ति महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर पुष्कळ ठिकाणीं दिसतात.

महाराष्ट्रीयांच्या कलोपासनेच्या बाबतींत आतांपर्यंत वर जी त्रोटक माहिती देण्यात आली आहे, तिच्यावरून या क्षेत्रात महाराष्ट्रीय मागासलेले नाहींत हें सिद्ध होईल. चित्रकला, शिल्पकला, संगीतकला व नाट्यकला ह्यात तर आधुनिक काळांत महाराष्ट्रीय कलावंत पुष्कळच पुढें गेले आहेत. अखिल भारतीय कीर्तीचे चित्रकार, शिल्पकार, नट व गायक आपल्या महाराष्ट्रांत आजहि विद्यमान असून, ते एकनिष्ठेनें कलोपासना करीत आहेत. महाराष्ट्राच्या डोंगराळ राकट प्रदेशाचा व निकृष्ट परिस्थितीचा उल्लेख करून, कलेच्या बाबतीत महाराष्ट्रीय मागासलेले आहेत, असें विक्षिप्त मत ज्ञानकोशकारानीं पंचवीस वर्षांपूर्वी दिलें होतें ! पण महाराष्ट्राच्या डोंगरांतच कैलासलेणें व अजिंठ्याचीं लेणीं—यांसारख्या नितांत रमणीय कलाकृति निर्माण झाल्या आहेत हें ते विसरले. महाराष्ट्रीयांची कलोपासना वैशिष्ट्यपूर्ण, भरीव व मौलिक स्वरूपाची आहे असें आमचें मत आहे.

---

## १०

# महाराष्ट्रांतील प्रमुख धार्मिक पंथ

(१) **वारकरी पंथ** —महाराष्ट्रांत वारकरी पंथाचे बरेच लोक आहेत. वारकरी याचा अर्थ पंढरपूर येथील श्रीपांडुरंगाच्या दर्शनास नियमाने जाणारा असा आहे. वर्षांतून दोनदां ( आषाढ शुद्ध एकादशी व कार्तिक शुद्ध एकादशी ) अगर त्याहून जास्त वेळां कोणत्या तरी एकादशीस गळ्यांत तुळशीची माळ घालून पंढरपुरास जाणारा तो पंढरीचा वारकरी, व त्याचा जो पंथ तो वारकरी पंथ होय. यांस माळकरी अथवा भागवत पंथ असेंहि म्हणतात. हा भक्तिप्रधान असून, अद्वैत-मताचा पुरस्कर्ता आहे. या पंथाचें उपास्य दैवत श्री पांडुरंग हें श्रीकृष्णाचें बाळरूप आहे. एकनाथी भागवत व चतुश्लोकी हे ग्रंथ वारकरी प्रमाणभूत समजतात. ह्या पंथाचा आरंभ केव्हां झाला हें नक्कीं सांगता आलें नाहीं, तरी ज्ञानेश्वर-नामदेवांच्या काळापासून तो अधिकाधिक बळावत चालला यांत शंका नाहीं. श्री द्वारकाधीश श्रीकृष्ण पुंडलिकाच्या सेवेनें संतुष्ट होऊन त्यांजकरितां पंढरीस आले ही गोष्ट सर्व संत मान्य करितात. वारकऱ्यांचे मंत्रभेदानें मुख्य चैतन्य, स्वरूप, आनंद व प्रकाश असे चार संप्रदाय आहेत. या पंथांत हरि व हर यांचें ऐक्य प्रतिपादिलें असल्यानें, यांत शैव व वैष्णव हे तंटे नाहींत. वारकऱ्यास जितकी एकादशी अवश्यक, तितकाच सोमवार अथवा महाशिवरात्रहि अवश्यक. या पंथाला वेद मान्य आहेत. वारकरी पंथाचे सांप्रतचे अध्वर्यु प्रि. शं. वा दांडेकर म्हणतात, "मुक्तिच्यां व भक्तीच्या मार्गांत जातीची किंमत नाहीं ही गोष्ट या पंथानें स्पष्टपणें निदर्शनास आणिली. एका विशिष्ट जातींतील, विशिष्ट आश्रम

धारण करणाऱ्यास मोक्ष मिळतो ही कल्पना रूढ होत चालली होती. तद्विरुद्ध 'उत्तमापासोनि अंत्यजवरि मुक्तीची सेल मागावी रे रे' अशी गवादी संतांनीं घातली. खरी भक्ति अद्वैतांतच होते, असें शिकविणारा हा पंथ आहे. या पंथाचें ध्येय सिद्धावस्थेनंतरहि 'ॲक्टिविझम' कर्म-शीलता आहे."

**(२) रामदासी संप्रदाय** :—हा संप्रदाय श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं स्थापन केला. या संप्रदायाचें मुख्य अंग समाजाची ऐहिक व पारलौकिक अशी दोन्ही प्रकारें उन्नति करणें हें आहे. खुद्द समर्थांनींच हरिकथानिरूपण, राजकारण व सावधपण असें या संप्रदायाचें मुख्य लक्षण सांगितलें आहे. वारकरी संप्रदाय मुख्यतः निवृत्तिपर आहे तर रामदासी संप्रदायांत प्रवृत्ति—निवृत्तींचा योग्य मिलाफ केला आहे. असुरमारक व देवांना बंदींतून सोडविणाऱ्या धनुर्धारी रामाची उपासना या संप्रदायांत असून, दासमारुतीच्या ऐवजीं भीममारुतीची उपासना रामदासी लोक करितात. ब्रह्मचारी राहून व भिक्षेवर उपजीविका करून निष्कामबुद्धीनें समाजाचें धारणपोषण करणें व शेवटीं त्याला आत्मज्ञानाची ओळख करून देणें हें या पंथांतील महंताचें मुख्य कर्तव्य आहे ह्या पंथाची बहुजनसमाजावरील पकड हल्लीं कमी कमी होऊ लागली आहे.

**(३) नाथपंथ** :—हा पंथ शैव असून यांत जातिबंधनें पुष्कळ सैल आहेत. या पंथाचा हटयोगावर व तंत्रमंत्र यांवर विशेष भरंवसा आहे. यांत स्त्रियांनाहि उपदेश देतात. मैनावती ही पहिली नाथपंथी स्त्री होय. तुकारामाच्या वेळची बहिणाबाई हिलाहि नाथसंप्रदायांत जागा मिळाली होती. निवृत्तिनाथ व ज्ञानेश्वर हे दोघे बंधू नाथपंथीय होते. नाथपंथीयांच्या जवळ शिंगी, पुंगी या वस्तु असतात. जेवणाच्या वेळी हे पुंगी वाजवून मग भोजन करतात. दीक्षा घेतांना यांना कान फाडून त्यांत कांच, स्फटिक किंवा काळ्या लांकडाचीं वलयें (मुद्रा) घालावीं लागतात. यावरूनच यांना कानफाटे म्हणण्याची चाल आहे. शिव हा परम देव असून, त्याच्यामध्यें

मानवी आत्म्यानें योगमार्गाने लीन होऊन जाणें हेंच अंतीम मानवी ध्येय होय, असें नाथपंथी मानतात. महाराष्ट्रांत ह्या पंथाचे फार लोक नाहींत.

(४) **महानुभाव पंथ :**–ह्या पंथाची स्थापना श्रीचक्रधर ह्यानें बाराव्या शतकांत ऋद्धिपूर येथें केली. ह्या पंथाचा प्रसार महाराष्ट्र, गुजरात, मध्यप्रांत, संयुक्तप्रांत, इदूर, पंजाब वगैरे भागांत पुष्कळ झाला. या पंथाचीं कृष्णमंदिरें काश्मीर, काबूल येथें असून, त्याचे अनुयायी गझनी कंदाहार-पर्यंत पसरले आहेत. ह्या पंथाचे धर्मग्रंथ मराठी भाषेत असल्यानें व ते सांकेतिक लिपींत कांहीं काळ लिहिले गेल्यानें, प्राचीन मराठी गद्य त्याच्या शुद्ध स्वरूपांत बघण्याची चांगली सोय झाली आहे. ह्या पथास वेद प्रमाण असून चातुर्वर्ण्य व्यवस्था आणि वर्णाश्रम धर्महि मान्य आहेत. महानुभावांचे दोन वर्ग आहेत; एक उपदेशी व दुसरा संन्यासी. उपदेशी वर्ग जातिधर्म मानणारा असून, संन्याशांमध्यें जातिनिर्बंध पाळीत नाहींत. स्त्रीशूद्रादि सर्वांस संन्यास घेतां येतो. हिंदूंच्या देवतांपैकीं दत्तात्रेय आणि श्रीकृष्ण हे देव महानुभाव पूर्णावतार म्हणून मानतात. महानुभाव भगवद्गीता मान-तात, पण तिचा द्वैतपर अर्थ लावतात. लीलाचरित्र व सिद्धांतसूत्रपाठ हे दोन ग्रंथ महानुभाव विशेष पवित्र मानतात. मध्यप्रांत व वऱ्हाड ह्या भागांत महानुभाव पंथीय कांहीं लोक आहेत.

(५) **दत्त संप्रदाय :**—हा संप्रदाय विशेषकरून महाराष्ट्रांत व महाराष्ट्रीयांत प्रचलित आहे. ब्रह्मा-विष्णु महेश ह्या तिन्ही देवांचें एकच दर्शन घडविणारी दत्तात्रेयाची मूर्ति महाराष्ट्रीयांच्या प्रीतीस जितकी पात्र झाली आहे, तितकी अन्यांना झालेली नाहीं. दत्तोपासक गंगाधर सरस्वति-कृत गुरुचरित्र ग्रंथ नित्य वाचतात. गाणगापूर, नरसोबाची वाडी हीं स्थानें दत्तोपासकांना विशेष पवित्र वाटतात. गुरुवारीं दत्तात्रेयाचें भजन करण्याचा प्रघात ह्या संप्रदायांत आढळतो. ब्रह्मा-विष्णु-महेश ह्या उत्पत्ति-स्थिति-संहारकर्त्या देवतांचा समन्वय करणाऱ्या श्रीदत्तात्रेयाची उपासना महाराष्ट्रांत वाढत्या प्रमाणावर आहे.

**(५) गोसावी संप्रदाय**—गोसाई, गुसाई, गोस्वामी वगैरे अनेक नांवानीं हा वर्ग ओळखला जातो. गोसावी हा एक हिंदु यतींचा वर्ग असून त्यांत शैव व वैष्णव असे दोन पंथ आहेत. महाराष्ट्रांतील गोसावी बहुतेक शैव आहेत. गोसावी लोकांत भटके (भिक्षेकरी) व गृहस्थ असें दोन वर्ग करता येतील. भटके गोसावी देवाच्या नांवाखालीं वाटेल तसा अनाचार करतात व त्यांच्यापासून अनौरस संततिहि उत्पन्न होत असते असें म्हणतात. चेले करण्याकरितां ते कित्येकदां मुलें बाळगतात किंवा विकत घेतात. उन्हातान्हांत व जंगलात राहून व विलक्षण कृति करून ते सशक्त व क्रूर बनलेले असतात. त्यानीं जर एकदां शस्त्र हातीं घेतले तर त्याना दाबात ठेवणें फार मुष्कीलीचे होतें असा अनुभव आहे. प्राचीन काळीं निरनिराळ्या गोसाव्यांच्या संघाच्या आपआपसात निकराच्या लढाया झाल्या आहेत. पूर्वी गोसावी लश्करांत देखील भरती होत असत. मराठा लश्करांत गोसाव्यांना घेण्याची चाल महादजी शिंद्याने काढली. महाराष्ट्र, वऱ्हाड, मध्यप्रांत, व हिंदुस्थानांतील बराच भाग यांत गोसाव्यांचे वास्तव्य आहे. सबंध हिंदुस्थानांत गोसाव्यांची संख्या सुमारे साडतीन लाखावर आहे. वऱ्हाड-खानदेश-मध्यप्रातात सुमारे साठ हजार गोसावी आहेत. ही जात श्री शंकराचार्यांच्या अद्वैतमताची अनुयायी आहे. गिरी, पुरी, भारती, सरस्वति, आश्रम, तीर्थ, पर्वत, सागर इत्यादि यांचीं दहा आडनावें आहेत. गोसाव्यात घरबारी, मठधारी, संन्यासी, वगैरे भेद आहेत. मात्र कोणालाहि घरबारी म्हणजे गृहस्थ होता येतें किंवा मठधारी किंवा संन्यासी राहतां येतें. या जातींत ब्राह्मणांचा व सर्व वर्णाच्या लोकांचा भरणा आहे असें दिसतें. वऱ्हाडांत देशमुखांचीं मुलें कांहीं गोसाव्याच्या घराण्यांत दिलेलीं आढळतात. यांचा मुख्य धंदा शेतीचा, त्याच्या खालोखाल व्यापार. कित्येक धर्मगुरुहि आहेत. वऱ्हाड व मध्यप्रांतांत ब्राह्मणेतर मंडळींत गोसाव्याचें शिष्य पुष्कळ आहेत. गोसावी मुख्यतः नारायण व शंकराचे उपासक आहेत. परंतु इतर देवांविषयीं त्यांच्यात अनादर नाहीं. यांत ऋक्-

संध्या करणारे कित्येक आढळतात. गायत्री, महिम्न, गीता यांचा पाठ पुष्कळ करतात. संन्याशाप्रमाणें गृहस्थ मृतासहि पुरतात व श्राद्धा-ऐवजी पुण्यतिथि (बरशी) पाळतात. लग्न एकाच मठीच्या घराण्यांत होत नाहीं. या मठी ५२ आहेत. पूर्वीच्या गोत्रप्रवराचा विसर पडल्यानें हल्लीं मठी ही गोत्रासारखी समजली जाते. आपला सामाजिक दर्जा द्विजाप्रमाणे आहे असें सुशिक्षित गोसावी म्हणतात. गोसावी हे सनातन धर्मानुयायी आहेत. हल्लीं गोसाव्यांत तो दसनामी असला तर रोटी बेटी व्यवहार इतर दसनाम्या बरोबर होऊं शकतो.

(७) **वीरशैव ऊर्फ लिंगायत:**—यांची लोकसंख्या सुमारे पन्नास लाख असून, यांचा मुख्य भरणा विजापूर, धारवाड, बेळगांव, वऱ्हाड, मध्यप्रांत, हैद्राबाद, म्हैसूर इत्यादि भागात आहे. सर्व लिंगायत स्त्री-पुरुषांच्या गळयांत चांदीच्या शाळुंकेत एक शिवलिंग असते. हें त्यांचे मुख्य धार्मिक चिन्ह असून तें नाहींसें होणें तें वाईट समजतात.

लिंगायत हे मूळचे द्रविडी असून ते आर्यांपूर्वी या देशांत होते, असें एन्थोवेन म्हणतो. महाराष्ट्रीयांप्रमाणें हे वर्णानें काळे असून कानडी व मराठी भाषा बोलतात.

शैवशास्त्र संपूर्ण वेदसंमत आहे. चारहि वेद हे शिवाच्या निश्वासाच्या रूपानें अनायासे अवतरले असून अकृत्रिम आहेत. शैवांचे चार प्रकार आहेत. (१) सामान्यशैव. हे कोणतेंहि शिवलिंग दृष्टीस पडतांच त्याचें पूजन करतात (२) मिश्रशैव. शंकर, अंबिका, विष्णु म्हणजे शाळिग्राम, गणपति व सूर्य ह्या शिवपंचायतनाची पूजा हे करतात. (४) शुद्धशैव. हे दीक्षासंपन्न असतात व प्रतिष्ठित लिंगाचीच फक्त पूजा करतात. (४) वीरशैव. दीर्घव्रतें व उपवास न करतां केवळ स्वेष्ट लिंगपूजेनें मुक्ति हे मिळवितात. ह्यातहि सामान्य वीरशैव, विशेष वीरशैव व निराभारी वीरशैव असे तीन भेद आहेत.

रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, एकोराम, पंडिताराध्य व विश्वाराध्य यांनीं

कलियुगांत वीरशैवमत स्थापन केलें. घंटाकर्ण, गजकर्ण, रेणुक, दारुक, विश्वकर्मा वगैरे परशिवाच्या गणांपैकीं पांच जणांनीं दरेक युगांत वीरशैव धर्माची स्थापना केली आहे. रेवणसिद्धाचार्य हा कोल्लिपाकी येथील सोमेश-लिंगापासून उत्पन्न झाला व त्यानें मलयाचलास अगस्त्यऋषीस या वीरशैव धर्माचा सिद्धांत सांगितला व सर्व देशांत तीर्थयात्रा करून व आलेल्या वादींना जिंकून मतप्रसार केला. यानें लंकेस एकाच मुहूर्तावर तीन कोटी लिंगांची स्थापना केली व अद्वैतसिद्धांतस्थापक शंकराचार्यांशीं परकायाप्रवेश-योगावर चर्चा करून यानें त्यांना चंद्रमौळीश्वर नांवाचें लिंग दिलें. हा चौदाशे वर्षें पृथ्वीवर होता. याच्याप्रमाणेंच बाकीचे चारी आचार्य निरनिराळ्या शिवलिंगांतून उत्पन्न होऊन त्यांनीं मतप्रसार केला.

या संप्रदायांत दीक्षा, संस्कार, शिवलिंगार्चन वगैरे नित्यनैमित्तिक वैदिक तांत्रिक कर्में करण्यास स्त्रियांनाहि अधिकार आहे.

वीरशैवांत ब्राम्हणादि चार वर्ण व ब्रह्मचर्यादि चार आश्रम आहेत. भक्त व माहेश्वर असे दोन ठळक भेद आहेत. भक्त म्हणजे शिष्यवर्ग, व गुरुवर्गाचें नांव माहेश्वर होय. माहेश्वर हे भक्तांच्या येथील हव्यकव्यादि कर्में करतात

आयुष्यांतील आचार आणि तत्वज्ञान यांची सांगड वीरशैव अशी घालतात. त्यांच्यांत पुरण्याची चाल आहे. ती संन्यासधर्माची द्योतक आहे. संन्याशी ज्या प्रमाणें वर्ण आणि आश्रम यांच्या बंधाच्या बाहेर असतो त्याप्रमाणें खऱ्या शैवानें असावे. रोजचा व्यवहार करीत असताना हृदयांत अनासक्ती असावी.

शिवार्चन हा कर्मयज्ञ, शिवाला उद्देशून शरीर झिजविणें हा तपयज्ञ, शिवपंचाक्षर-प्रणव-रुद्रादि अभ्यास हा जपयज्ञ, शिवरूपचिंतन हा ध्यान-यज्ञ व शिवागम हा ज्ञानयज्ञ वीरशैव मानतात.

शिवच मोक्षदाता व उपास्यदैवत, त्याच्या खेरीज दुसऱ्या कोणाची पूजा स्वप्नांतहि करूं नये, ज्या घरांत शिवाखेरीज इतर देव असतील तेथें

राहूं नये, शिवलिंग व शिवालयाचें रक्षण स्वतःचे प्राण देऊनहि करावें. स्थावर व परार्थ लिंगपूजा करावी, शिवार्थ सांगणारें वेदाध्ययन व अध्यापनादि षट्कर्मे करावींत, रुद्राक्षमाळा घालाव्यात, त्रिकाल निदान एकदां तरी लिंगपूजा केल्याशिवाय पाणी सुद्धां पिऊं नये, गुरुदत्त शिवलिंग हें उत्तमांग, गळा, हात, छाती यांपैकीं एखाद्या ठिकाणीं धारण करावें, शिवलिंगाचा किंचित् वियोग झाल्यास प्राण ठेवूं नये, वीरशैवेतरांनीं स्वतःचा स्वयंपाक पाहिल्यास तो त्याज्य मानावा, व अहिंसेला प्राधान्य द्यावें इत्यादि प्रमुख कर्तव्यें वीरशैवांचीं मानिलीं जातात. वेद, आगम, उपनिषदें वेदविरुद्ध स्मृत्यादि ग्रंथ प्रमाणत्वानें हे मानतात; त्यांची निंदा करीत नाहींत. मात्र शिवभक्ति ज्यांत वर्णिलेली आहे त्या भागास जास्त मानतात.

विवाह ब्राह्म पद्धतीनें आपल्या पुरोहिताकडून करवितात. लाजाहोम इत्यादि होम करीत नाहींत. पंचकलश स्थापून त्यांत पंचाचार्यांचें आवाहन करून त्यांच्या साक्षीनें लग्न लागतें. पुनर्विवाहाची रूढि कुठे कुठें आहे. यांच्यांतील और्ध्वदेहिक कर्म फार निराळें आहे.

वीरशैवांत सृष्टि दोन प्रकारची मानली आहे. ब्रह्मनिर्मित ती प्राकृत व शिवनिर्मित ती अप्राकृत. ज्ञानक्रियाशक्तियुक्तचैतन हें एकच चिद्-चिद्विशिष्टाद्वैत शिवतत्व होय. सगुण ब्रह्मवाद ह्यांना मान्य आहे. मुक्ति म्हणजे निरंजन साम्य. सायुज्य व कैवल एकच. पतिपदार्थ शिव व पशुपदार्थ ब्रह्माविष्णु आदि जीव यांत तरतम भाव आहे. पतीला स्वरूपवश झालेले पशु विभीत शोक होऊन पतिसेवा करतात. पशु-पाश पति हे पदार्थत्रय आहे. प्रपंच सर्व मिथ्या. विष्णु वगैरे पशु (जीव) मध्यें नित्यमुक्त, अधिकारिक, बद्ध, केवलजड अशा कांहींशा महानुभावीय पंथाप्रमाणें हे अवस्था मानतात. पशुपति हें उपास्य दैवत. प्रणव व ब्रह्मशब्द हे सदाशिवेक बोधक आहेत असें वीरशैव मानात.

## ११

# महाराष्ट्रांतील प्रसिद्ध स्थळें

**अमरावती :—**हें अमरावती जिल्ह्याचें मुख्य शहर असून, त्याची लोकसंख्या सुमारें चाळीस हजार आहे. हें जी आय. पी. रेल्वेच्या बडनेरा–अमरावती शाखेवर आहे. येथें पुष्कळ हिंदुंची व जैनांचीं देवळें आहेत. अमरावतींत अंबेचें देवालय सर्वांत जुनें मानलें जातें. याच देवळांत रुक्मिणी दर्शनास आली असतांना तिची व कृष्णाची भेट झाली असें मानतात. ह्या समारंभ पाहण्यास बरेच वऱ्हाडी किंवा वरहारी आले होते. हे लोक पुढें येथेंच स्थाईक झाल्यावर, त्यांनीं त्याला वरहार किंवा वऱ्हाड म्हणायला सुरुवात केली. गांवांतील बिसनचंद याची हवेली व गांवाभोवतालचा तट हीं प्रेक्षणीय आहेत. अमरावतीजवळ असलेलें ऋद्धिपुर हें गांव महानुभाव पंथियांचें मोठें यात्रेचे ठिकाण मानलें जातें.

**अमळनेर :—**पंढरपूरच्या विठ्ठलाच्या भक्तांपैकीं एक प्रसिद्ध भक्त सखाराम महाराज यांची समाधि अमळनेर (खानदेश) येथें आहे. हे सत्पुरुष १९ व्या शतकाच्या आरंभीं होऊन गेले. ते नियमानें पंढरपूरच्या वाऱ्या करीत असत. एकेवर्षीं ते आषाढीच्या वारीस पंढरपुरास गेले असतां त्यांची भक्ति पाहून विठ्ठलानें त्यांस समक्ष दर्शन दिलें. तेव्हांपासून त्यांची कीर्ति वाढून लोकांची त्यांच्या ठिकाणीं भक्ति जडली. दुसरे बाजीराव पेशवे व मालेगांवचे राजेबहाद्दर यांची महाराजाचें ठिकाणीं फार भक्ति होती. महाराज इ. स. १८१८ मध्यें समाधिस्थ झाले. दरसाल येथें वैशाख शुद्ध एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत मोठी यात्रा भरते. या शिवाय अमळनेर येथील तत्त्वज्ञानमंदिर व नवीन निघालेलें प्रताप कॉलेज ह्या संस्था उल्लेखनीय आहेत.

**अलिबाग**:—हा किल्ला अलिबागेजवळ समुद्रांत बांधिला असून त्याची लांबी ९०० फूट व रुंदी ३५० फूट आहे. त्याला सतरा प्रचंड बुरुज व दोन दरवाजे आहेत. मराठेशाहीच्या आरमारावरील मुख्य जागा कान्होजी आंग्रे यास मिळाल्यावर हा किल्ला त्याच्या ताब्यांत येऊन (इ. स. १६९८) त्याची प्रसिद्धी वाढली. ह्या किल्ल्यावर इंग्रज, पोर्तुगीझ व जंजिऱ्याचा शिद्दी यांनीं हल्ले करूनहि त्यांना त्यांत यश आलें नाहीं. पेशवाई बुडाल्यावर हा किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत आला. किल्ल्याची रचना बळकट असून, आजूबाजूची सृष्टिशोभा फार चांगली दिसते.

**अहमदनगर**:—येथील दीर्घवर्तुलाकृति भुईकोट किल्ला निजामशाहींतील पहिला सुलतान मलिक अहमद बहिरी ह्यानें इ. स. १४९४ च्या सुमारास बांधिला. ह्यास २४ बुरुज आहेत. अकबराचा मुलगा मुराद ह्यानें इ स. १५९६ मध्यें या किल्ल्यास वेढा दिला असतां चांदबीबी ह्या शूर स्त्रीनें त्याच्याशीं लढून किल्ल्याचा बचाव केला. इ. स. १७५९ मध्यें सदाशिवराव भाऊ पेशव्यांनीं हा किल्ला जिंकून घेतला. पुढें हा शिंद्यांच्या ताब्यांत होता व नंतर जनरल वेल्स्लीनें तो १८०३ मध्यें रघुरावबाबा देशमुख यांच्या साहाय्यानें सर केला. मोंगल बादशहा औरंगजेब हा दक्षिण हिंदुस्थान जिंकण्याच्या इच्छेनें इ. स. १६८३ मध्यें निघाला असतां मराठ्यांपुढें त्याचें कांहीं न चालून तो अहमदनगर येथें आजारी पडला व इ. स. १७०७ मध्यें मरण पावला. त्याचा दर्गा अहमदनगरपासून तीन मैलांवर आहे. त्याचें प्रेत मोंगलाईत वेरूळजवळ रोझें येथें नेऊन पुरण्यांत आले व त्यामुळें त्याची मुख्य कबर तेथेंच आहे. अहमदनगर येथें फक्त त्याच्या शवास स्नान घातलें व त्या जागेवर एक कबर बांधण्यांत आली. येथें प्रतिवर्षी औरंगजेबाच्या मृत्युदिवशीं मोठा उरूस भरतो. अहमदनगर किल्ल्याच्या उत्तरेस अर्ध्या मैलावर हजरत शाहशरीफ ह्या मुसलमान साधूंचा दर्गा आहे. राजे मालोजी भोंसलें ह्यांस शाहशरीफ ह्यांच्या कृपेनें दोन पुत्र झाले म्हणून त्यांनीं त्यांचीं नांवें शहाजीव शरीफजी

अशीं ठेविलीं. ह्याच शहाजीच्या पोटीं शिवाजी महाराज जन्मले. शाहशरीफ हे इ. स. १६१७ च्या सुमारास मरण पावले. अहमदनगरजवळील शहापूर गांवीं सलाबतखान व त्याची पत्नी ह्यांच्या कबरी आहेत. त्या उंचवट्यावर असून अत्यंत प्रेक्षणीय आहेत.

**आळंदी** :—पुणें जिल्ह्यांत खेडच्या दक्षिणेस बारा मैलांवर हें तीर्थाचें ठिकाण आहे. पुण्याहून मोटरीनेंहि आळंदीस जातां येतें. येथें ज्ञानेश्वर महाराजांची समाधि व देऊळ असल्यामुळें, दरवर्षी लाखो वारकरी संप्रदायांतील तसेच इतर लोक येथें येत असतात. गांवाला लागूनच इंद्रायणी नदी आहे. ज्ञानेश्वरांच्या वेळीं व पेशवाईत आळंदीला अलकापुर म्हणत असत. ज्ञानेश्वर महाराजांचें देऊळ चांगलें मोठें असून, त्याला तीन दरवाजे आहेत. ज्ञानेश्वरांच्या समाधीवर त्यांची एक तीन फूट उंचीची व चांदीच्या मुखवट्याची मूर्ति स्थापिलेली असून, मागें विठोबारखुमाईच्या मूर्ति आहेत. हें देऊळ तीनशें वर्षांपूर्वी कोणी आंबेकर देशपांड्यांनीं बांधले आहे. या देवळाखेरीज आळंदींत बहिरोबा, मल्पा, मारुती, पुंडलिक, राम व विष्णु यांचीं देवळें आहेत. सुप्रसिद्ध योगी चांगदेव यांच्या भेटीला म्हणून ज्ञानेश्वर एका निर्जीव भिंतीवर बसून गेले, ती भिंत येथील लोक दाखवितात. पुढें चांगदेवांचा गर्व नाहींसा होऊन त्यांनीं ज्ञानेश्वरांची बहीण मुक्ताबाई हिच्याकडून गुरूपदेश घेतला. चांगदेवानीं शके १२१५ मध्यें पुणतांबे क्षेत्रीं समाधि घेतली. कार्तिक वद्य एकादशीस येथें मोठी यात्रा भरते. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई या चार थोर भावंडांमुळें आळंदीचें नांव महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें आहे. ज्ञानेश्वरांनीं शके १२१८ मध्यें आळंदी येथें समाधि घेतली.

**औदुंबर** :—हें क्षेत्र सातारा जिल्ह्यांतील भिलवडी गांवाजवळ कृष्णानदीच्या कांठीं आहे. येथील दत्ताचें स्थान मोठें जागृत मानलें जातें. गुरुचरित्रांत या क्षेत्राचें वर्णन आलें आहे. ह्या भागांत औदुंबराचे वृक्ष पुष्कळ असल्यानें ह्याला औदुंबर असें नांव पडलें आहे. मुख्य देवळाभोंवतीहि

औदुंबराचे बरेच वृक्ष आहेत. मंदिराच्या पुढून कृष्णानदी वाहते नरसो-बाच्या वाडीप्रमाणेंच येथेंहि कुष्टरोगग्रस्त व भूतपिशाच्चांनीं पीडित लोक देवाच्या सेवेकरितां येऊन राहतात. येथें गुरुद्वादशी (अश्विन वद्य द्वादशी) व दत्तजयंति (मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा) निमित्त मोठी यात्रा भरते. येथें दत्ताच्या देवळाशिवाय कांहीं मठ, समाधि व मंदिरें पाहण्यासारखीं आहेत. सदर्न मराठा रेल्वेच्या भिलवडी स्टेशनापासून औदुंबरास जातां येतें.

**औरंगाबाद** हें औरंगाबाद विभागाचें मुख्य शहर असून येथील लोक-संख्या सुमारे चाळीस हजार आहे. याचें पूर्वीचें नांव खडकी किंवा फत्तेनगर. इ. स. १६३५ व १६५३ या वर्षी औरंगजेब या प्रांताचा सुभेदार म्हणून खडकी येथें असतां, त्यानें या गांवास औरंगाबाद हें नांव दिलें. औरंगझेबाच्या मरणानंतर पहिला निजाम असफजाह हा औरंगाबादेस येऊन स्वतंत्र झाला व पुढें त्याने हैद्राबाद ही आपली राजधानि केली.

औरंगाबाद हें व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथें सुभेदार वगैरे सरकारी कामदार राहतात. शहरांत एक औद्योगिक शाळा, एक कलाशिक्ष-णालय, तीन हायस्कुलें व एक कॉलेज आहे. शहरांतील पाणीपुरवठ्याच्या सोयी मलिकंबर व औरंगझेब यांच्या वेळीं तयार केलेल्या आहेत. प्रेक्षणीय इमारतींत ताजमहालच्या धर्तीवर बांधलेला मकबरा (औरंगझेबाची पत्नी दिलरसबानूचें थडगें), मलिकंबरनें बांधलेली जुमामशिद, औरंझेबाचा राजवाडा, व किल्ला हीं मुख्य आहेत.

**कनकेश्वर-अलिबाग :**—अलिबागेपासून आठ मैलांवर १३०० फूट उंचीची ही टेकडी असून तिच्या माथ्यावर एक अष्टकोनी कुंड व गणपति, रामेश्वर, लक्ष्मीनारायण व मुख्य कनकेश्वर अशीं देवळें आहेत. टेकडीवर चढायच्या रस्त्याच्या दुतर्फा अशोकाचीं झाडें असून, तेथून समुद्राचा देखावा अनुपम दिसतो. कनकेश्वराचें देऊळ फार जुनें असून ते हेमाडपंती धाटणीचें असावेंसें वाटतें. देवळाच्या मध्यभागीं खोल गाभारा असून त्याच्या मध्यभागीं शिवलिंग आहे.

**कऱ्हाड :**—सातारा जिल्ह्यांतील कृष्णा-कोयनांच्या संगमावरील कऱ्हाड शहराचा उल्लेख प्राचीन शिलालेखांत केलेला आढळतो. हें शहाजी राजास विजापूरच्या महमद अदिलशहाकडून इ. स. १६३७ मध्यें मिळालें. शहराजवळ असलेला भुईकोट किल्ला, प्राचीन गुहा व मनोरे हीं प्रेक्षणीय आहेत. विजापूरच्या अल्ली अदिलशहाच्या कारकीर्दीत इब्राहीमखान नांवाच्या सरदारानें हे मनोरे बांधिले.

**कोल्हापूर :**—कोल्हापूर संस्थानच्या राजधानीचें हें शहर असून तें सदर्न मराठा रेल्वेवर मिरज-कोल्हापूर या फांट्यावर आहे. शहराची लोकसंख्या सुमारें एकलाख आहे. कोल्हापूर हें दक्षिण काशी या नांवानें पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे. येथें पुष्कळ देवालयें असून, त्यांपैकीं अंबाबाईचें देऊळ फारच भव्य व उत्कृष्ट आहे. येथें पुष्कळ लोक यात्रेनिमित्त येतात. त्यांत चार शिलालेख आहेत. त्यांतील सर्वांत प्राचीन शके ११४० चा आहे. त्यावरून हे देऊळ शिलाहार वंशांतील राजांनीं बांधिलें असावें असें दिसते. देवळांतील अंबाबाईची मूर्ति कृष्ण पाषाणाची असून ती सुंदर व पश्चिमाभिमुख आहे. ह्या देवस्थानास ५००० रुपयांचें वर्षासन आहे. या शहराजवळच जें करवीर नांवाचे खेडें आहे तें पूर्वीं संस्थानचें मुख्य ठिकाण होतें. याचें कोल्लापुरम् म्हणून दुसरें नाव असून, तें चोलांच्या इतिहासांत येतें. दुसरा राजेंद्र चोल यानें चालुक्यांवर स्वारी करून त्यांचा पराभव केल्यानंतर या गांवीं एक विजयस्तंभ उभारल्याचें (सुमारे १०६० त) एके ठिकाणीं नमूद केलेलें आहे. (अय्यर-एन्शंट इंडिया). १८७७ सालीं उत्खनन करीत असतांना येथें बौद्ध लोकांच्या एका मोठ्या देवळाचा अवशेष सापडला. त्यांतील भव्य दगडी पेटींत धम्मगुप्तानें ब्रह्म यांस दिलेल्या देणगीविषयींचा ख्रिस्तीशकाच्या पूर्वीचा तिसऱ्या शतकांतील लिपींत लिहिलेला एक लेख सांपडला. कोल्हापुरास जीं तांब्याचीं व शिशाची नाणीं सांपडलीं आहेत, त्यांवरून ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकांत येथें शातकर्णी किंवा आंध्रभृत्यांचा अंमल चालू होता. कोल्हापुरांतील १८ चौकी जुना

राजवाडा प्रेक्षणीय आहे. त्याखेरीज नवे राजवाडे व नवीन कॉलेजांच्या इमारती त्याहि उल्लेखनीय आहेत.

**गणपतिपुळें** :—हें स्थान रत्नागिरीच्या उत्तरेस सहा कोसांवर समुद्र-कांठीं एका डोंगराच्या पायथ्याशीं आहे. येथील स्वयंभू गणपति अष्टविना-यकांपैकीं एक आहे. देवळाच्या मागें जो डोंगर आहे त्यास गोल डोंगर असें नांव असून, गणपतीची ती निराकार मूर्ति आहे असें लोक समजतात व त्यास प्रदक्षिणा घालतात. दक्षिण महाराष्ट्रांतील सांगली, मिरज, कुरुंदवाड, जमखिंडी येथील पटवर्धन घराण्यांतील संस्थानिक पुळें येथील गणपतीला आपलें कुलदैवत मानितात. देवळाचा सभामंडप श्रीमंत सांगलीकरांनीं बांधिला. देवळाजवळील धर्मशाळा थोरल्या माधवराव पेशव्यांची पत्नी सती रमाबाई हिनें बांधिली. येथील गणपतीचा उत्सव वर्षांतून दोनदां (भाद्रपद शु. १ ते ५ व माघ शु. १ ते ५) होतो.

**घृष्णेश्वर** :—हें तीर्थ असून, बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक ज्योतिर्लिंग येथें आहे. औरंगाबादेहून सुमारे वीस मैलांवर हें स्थान असून, मोटरीनें तेथें जाण्याकरितां चांगली सडक आहे. देवळाचें नक्षीकाम चांगलें असून, जवळच एक पाण्याचें कुंड आहे. सुप्रसिद्ध वेरुळचीं लेणीं घृष्णेश्वरापासून अगदीं जवळ आहेत.

**चांदा** :—हें चांदा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून तें वरोडा रेल्वे-स्टेशनपासून २८ मैलांवर आहे. याची लोकसंख्या सुमारे बावीस हजार आहे. येथें बाराव्या शतकापासून ते अठराव्या शतकापर्यंत गोंड राजांची राजधानी होती. एरई व झरपत या नद्यांचा संगम येथें झाला आहे. अचलेश्वर, महाकाली व मुरलीधर अशीं तीन देवळें येथें मुख्य आहेत. शहराबाहेर रावण, दुर्गा वगैरे देवतांच्या मोठाल्या मूर्ति पडलेल्या आहेत. रेशमी कापड, रेशीम काठीं धोतरें, नक्षीदार जोडे, सोन्याचांदीचीं भांडीं व बांबू विणकाम येथें चांगलें होतें. या गांवांत पुष्कळ इंग्रजी व मराठी शाळा असून, एक हायस्कूल आहे. सरकारी कचेऱ्या, दवाखाने म्युनिसिपालिटी हींहि येथें आहेत.

**चाफळ:**—हें क्षेत्राचें ठिकाण सातारा जिल्ह्यांत मांडवी नदीच्या कांठीं असून उंब्रजच्या पश्चिमेस सहा मैल आहे. हें गाव शिवाजीचे गुरु रामदास स्वामी याच्या बंधुच्या वशजास इनाम आहे. साताऱ्याच्या छत्रपतींचें हें गुरुघराणें होय. नदीच्या दोन्ही बाजूस हें गांव आहे. गांवांत रामदास स्वामींचा वाडा असून, वाड्याच्या मध्यभागीं रामदास स्वामींनीं स्थापिलेल्या श्रीरामाचें व मारुतीचें देऊळ असून तें १७७६ सालांत बाळाजी मांडवगणे नांवाच्या श्रीमंत गृहस्थानें बांधिलें. रामनवमीस येथें यात्रा भरते. चाफळास श्रीरामाची स्थापना समर्थांनीं शके १५७१ त केली. ही मूर्ति अंगापुरच्या डोहांतून समर्थांनीं काढिली असून ती रथारूढ व धनुष्यबाण हातीं घेतलेली अशी आहे. रामापुढें दासमारुती व मागें वीरमारुती आहे. समर्थांच्या अकरा मारुतींतच या दोन मारुतींचा समावेश होतो. चाफळच्या जवळ असलेल्या शिंगणवाडी येथें शिवाजीराजे यांना समर्थांनीं अनुग्रह दिला (१६४९). येथून दोन कोसांवर रामघळ, कुबडीतीर्थ, भैरोबाचा डोंगर वगैरे समर्थांशीं संबंध आलेलीं स्थळें आहेत. चाफळच्या रामाच्या संस्थानास शिवरायांनीं १६७५ मध्यें १२१ खंडी धान्य नेमून दिलें व १६७८ मध्यें ३३ गांवें व ४१९ बिघे जमीन इनाम दिली. अद्यापिहि हें इनाम चालू आहे. समर्थांनीं करविलेला रामाचा रथ येथें अजूनहि आहे.

**चिंचवड:**—हें क्षेत्र पुण्याच्याजवळ पवनानदीच्या उत्तर तीरावर आहे. हें जी. आय. पी. रेल्वेचें स्टेशनहि आहे. नदीच्या कांठावर मोरया गोसावी नावाच्या सिद्ध पुरुषाची समाधि व मोरयाचें देवालय आहे. समाधीच्या आंत एक शिलालेख आहे. त्यावरून ती इ. स. १६५९ सालीं बांधिली असें दिसतें. मोरया गोसावी हे सुमारे २७० वर्षांपूर्वीं चिंचवड येथें राहत असत येथून ते ५० मैलांवर असणाऱ्या मोरगांव येथील गणपतीच्या दर्शनास महिन्यातून एकदां जात असत. हा त्यांच्या क्रम म्हातारपणापर्यंत चालला होता. पुढें त्यांची भक्ति पाहून गणपति त्यांस प्रसन्न झाला व तो चिंचवड येथें आपल्या भक्ताजवळ येऊन प्रकट झाला. मोरया

गोसावी ह्यांच्या सात पिढ्यांतील वंशजांस प्रत्यक्ष गणपतीचे अवतार समजण्यांत येऊन त्यांस देव असें म्हणत. ह्या सात देवांच्या समाधि नदी कांठीं आहेत. येथें दरवर्षी मार्गशीर्ष वद्य तृतीया ते षष्ठीपर्यंत मोठा उत्सव होतो.

**जेजुरी**:—पुणें जिल्ह्यांत सासवडच्या आग्नेयीस दहा मैलांवर हें गांव आहे. हें एक मोठें यात्रेचें ठिकाण असून तें सदर्न मराठा रेल्वेवर एक स्टेशन आहे. येथील खंडोबा हें मुख्य दैवत आहे. त्याची मुख्य यात्रा चंपाषष्ठीस भरते. ह्या देवास बहिरोबा, मल्हारी, मार्तंड हींहि नांवें आहेत. येथील खंडोबाचीं दोन देवालयें उंच टेकड्यांवर आहेत. त्यास कडेपठार म्हणतात. गांवाच्या दक्षिणेस रावबाजी पेशवे यांनीं बांधलेला एक मोठा तलाव आहे. तुकोजी होळकरानें बांधलेलाहि येथें एक तलाव आहे. ह्या तलावाच्या व गांवाच्या मध्यें एक महादेवाचें (मल्हारराव होळकरांच्या स्मरणार्थ बांधलेलें) देवालय असून तेथें देवामागें मल्हारराव व त्याच्या तीन बायका बनाबाई, द्वारकाबाई व गौतमाबाई यांच्या मूर्ति आहेत.

'खंडोबाच्या देवळास जाण्यास पुष्कळ पायऱ्या चढून जावें लागतें. वाटेंत हेगडी या धनगर (देवाच्या) प्रधानाची समाधि लागते. जवळच खंडोबाची भार्या बनाई हिची समाधि आहे. खंडोबाच्या पहिल्या बायकोचें नांव म्हाळसा; ह्या दोघी परस्परांचा मत्सर करीत असल्यामुळें खंडोबानें एकीस शिखरावर नेऊन बसविलें व एकीस पायथ्याशीं ठेविलें. देवळाच्या समोरील आवारांत एक मोठी वीस फूट परिघाची व पितळी पत्र्यानें मढविलेली कासवाची आकृति व एका खांबाशीं नऊ फूट उंचीची एका मल्लाची मूर्ति आहे. (खंडोबा हा मल्ल+अरि=मल्लारि—मल्हारि असल्यानें ही मूर्ति असावी.) देवळांतील एका मोठ्या घंटेवर पोर्तुगीज भाषेंत व दुसऱ्या घंटेवर मराठींत कोरलेले लेख आहेत. चार फूट लांबीचें पातें असलेली एक तरवार येथें असून ती मल्ल राक्षसाची आहे असें सांगतात. देवळात एक शके १५९७ सालचा शिलालेख आहे. गाभाऱ्यांत शिवलिंगाच्या मागच्या बाजूस मार्तंड, खंडेराव व म्हाळसा ह्यांच्या सोन्याचांदीच्या तीन मूर्ति

आहेत. शके १३०३ व १५९७ सालचे लेख येथील उंबरठ्यावर कोरलेले आहेत. या देवळामागें विठ्ठलराव देव चिंचवडकरांनीं बांधलेलें पंचलिंगाचे देवालय आहे व त्याच्या मागें भंडारा वाटण्याची खोली आहे. कडेपठारावर खंडोबाचें जुनें देऊळ आहे. ह्या दोन देवळांच्या मध्यें खंडोबाच्या घोड्याचें खूर उमटल्याची एक जागा दाखवितात. आख्यायिका अशी आहे कीं मल्लासुर राक्षस ब्राह्मणास फार छळीत असे. तेव्हां शिवानें खंडोबाच्या रूपानें अवतार घेऊन त्याचा नाश केला. मृत्युकाल जवळ आला पाहून मल्लानें शैव धर्माची दीक्षा घेऊन तो व खंडोबा दोघेहि शिवरूपी विलीन झाले.

**जोतिबाचा डोंगर** :—कोल्हापूर शहराच्या वायव्येस ९ मैलांवर पायथ्यापासून एक हजार फूट उंचीचा हा एक डोंगर आहे. डोंगरावर दीड हजार लोकवस्तीचें खेडें असून, खेड्याच्या मध्यभागीं केदारलिंग, केदारेश्वर आणि रामलिंग अशी तीन जोतिबाचीं देवळें आहेत. स्थानिक दंतकथा अशी आहे कीं कोल्हापूरच्या अंबाबाईस राक्षसांनीं अत्यंत त्रास दिला. त्यामुळें ती त्रस्त झाली व तिनें हिमालयांत जाऊन केदारनाथाची तीव्र तपश्चर्या केली व राक्षसांचा नाश व्हावा अशी प्रार्थना केली. तिच्या प्रार्थनेवरून केदारेश्वर जोतिबाच्या डोंगरावर येऊन राहिले. पूर्वीचें देऊळ कोणी नावजी सय यानें बांधलें असें म्हणतात. त्याच्या जागीं हल्लींचें देऊळ राणोजी शिंदे यानें इ. स. १७३० मध्यें बांधिलें केदारेश्वराचें दुसरें देऊळ १८०८ सालीं दौलतराव शिंदे यांनीं बांधिलें. रामलिंगाचें देऊळ इ.स.१७८० मध्यें मालजी पन्हाळकर यांनीं बांधिलें. ज्योतिबानें रत्नासुर नामक राक्षसाचा नाश केला म्हणून या जागेस रत्नागिरी असेंहि म्हणतात. चैत्री पौर्णिमेस या विजयाप्रीत्यर्थ येथें दरवर्षीं मोठी जत्रा भरते. त्यावेळीं ४०|५० हजार लोक जत्रेस जमतात. याशिवाय येथें चोपदाई व यमाई या देवींचीं देवळें आहेत.

**ठाणेंशहर** :—हें या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. ते खाडीच्या

कांठीं असून बंदर व रेल्वे स्टेशन आहे. लोक संख्या सुमारे तीस हजार आहे. येथें फिरंगी लोकांनीं बांधिलेला एक जुना किल्ला आहे. जिल्ह्याच्या कलेक्टरची व डिस्ट्रिक्ट जजची येथें कचेरी आहे. वेड्यांचें इस्पितळ व मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्था उल्लेखनीय आहेत.

**तुळजापूर** :—हैद्राबाद संस्थानांतील उस्मानाबाद जिल्ह्यांत हें असून, तें सोलापुरापासून २८ मैलांवर व उस्मानाबादेपासून १४ मैलांवर आहे. येथें डोंगराच्या पायथ्याशीं तुळजा भवानीचें देऊळ आहे. दसऱ्याच्या पौर्णिमेस येथें मोठी यात्रा जमते. कोल्हापूर व साताऱ्याच्या राजांनीं भवानीचें देऊळ बांधलें असें म्हणतात. येथील लोकसंख्या सुमारे आठ हजार असून, तुळजापूर ही व्यापाराची मोठी पेठ आहे.

**तोरणा** :—हा किल्ला पुण्यापासून २० मैलांवर भोर संस्थानच्या हद्दींत आहे. शिवाजीनें तो विजापूरच्या बादशहाकडून वयाच्या सोळाव्या वर्षीं इ.स. १६४६ मध्यें जिंकून, स्वराज्याचें जणूं काय तोरणच येथें बांधिलें. किल्ल्याची दुरस्ती करीत असतांना महाराजांना येथें मोहोरांनीं भरलेला हंडा सांपडला, त्यामुळें ईश्वराची त्यांच्यावर कृपा आहे असे समजून भाविक मावळे त्यांना हजारोंनीं येऊन मिळाले.

**त्र्यंबकेश्वर** :—हें तीर्थस्थान नाशिकाहून सुमारे पंधरा मैलांच्या अंतरावर असून, येथें मोटरी जाऊं शकतात. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक ज्योतिर्लिंग येथें आहे. ज्योतिर्लिंग जेथें आहे तें देऊळ मोठें व प्रशस्त असून, देवळाचें नक्षीकाम चांगलें आहे. देऊळ बांधण्याचें काम नानासाहेब पेशव्यांनीं सुरू केलें व तें त्यांच्या मृत्यूनंतर सन १७८६ मध्यें पूर्ण झालें. गोदावरीचा जेथून उगम होतो तें गंगाद्वार (पर्वतशिखर) त्र्यंबकेश्वराला लागूनच आहे. येथें हजारो लोक यात्रेकरितां येतात. येथेंच ज्ञानेश्वरांचे वडिल बंधु निवृत्तिनाथ यांची समाधि गंगासागर तलावावर असून, पौष वद्य एकादशीस तेथें मोठी यात्रा भरते. त्र्यंबकेश्वर येथील आजूबाजूची सृष्टिशोभा फारच चित्तवेधक आहे.

**थाळनेर**:—हा किल्ला पश्चिम खानदेशांतील थाळनेर गांवाच्या दक्षिणेस तापी नदीच्या कांठीं आहे. चवदाव्या शतकांत यादव वंशीय रामचंद्र नांवाच्या गवळी राजानें हा बांधिला. फरुकी राजांच्या ताब्यांत खानदेश प्रांत आल्यावर, ह्या किल्ल्यावर गुजरातचा बादशहा पहिला अहमद, महंमद, चेंगीझखान व अकबर इत्यादिंनीं अनेक वेळा हल्ले केले. मुसलमानी अमलानंतर हा किल्ला मराठे, पेशवे, होळकर व इंग्रज यांच्या अंमलाखालीं आला. हा किल्ला आतां जवळजवळ नामशेष झाला आहे. थाळनेर जवळच फरुकी राजांच्या कबरी असून, त्यांना हजिरे ह्मणतात. हे एकंदर आठ असून, त्यांपैकीं सर्वांत मोठा हजिरा पहिला फरुकीबादशहा मलिकराजा याचा आहे. फरुकी राजांनीं चौदावें व पंधरावें अशीं दोन शतकें खानदेशांत राज्य केलें.

**थेऊर**:—पुण्याच्या पूर्वेस १३ मैलांवर मुळामुठेच्या कांठीं हें गणपतीचें प्रसिद्ध तीर्थक्षेत्र असून थोरले माधवराव पेशवे हे गणपतिभक्त असल्यानें त्यांनीं तेथील गणपतीच्या देवळाप्रीत्यर्थ बराच खर्च केला व येथें ते वारंवार येऊन राहत. क्षयरोगानें आजारी असतांना ते येथेंच होते व त्यांनीं येथेंच १८ नोव्हेंबर १७७२ रोजीं देहत्याग केला. त्यांची पत्नी रमाबाई हिनें त्यांच्याबरोबर सहगमन केलें. तिचें वृंदावन नदीकांठीं आहे.

**देहू**:—पुण्याहून तीस मैलांवर इंद्रायणीच्या दक्षिण तीरावर हें खेडें आहे. ज्ञानेश्वरांच्या अवतारकार्यामुळें ज्याप्रमाणें आळंदी प्रसिद्धीस आली, त्याचप्रमाणें तुकोबांच्या अवतारकार्यामुळें देहू प्रसिद्धीस आलें. येथें तुकाराम महाराजांचा जन्म झाला व बाकीचें आयुष्य त्यांनीं येथेंच घालविलें. फाल्गुन वद्य द्वितीयेस येथें मोठी यात्रा भरते. देहू येथें एका विठोबाचें देऊळ आहे. तेथें दर एकादशीस हजारो लोक जमतात. ज्या डोंगरांवर तुकाराम महाराजांनीं तपश्चर्या केली ते भामनाथ व भंडारा हे डोंगर देहू जवळच आहेत. तुकारामांची समाधि येथें असून, समाधीच्या जागीं वृंदावन व शिला आहेत. तुकारामबुवा सोमवार फाल्गुन वद्य २ शके १५७२

रोजीं सदेह वैकुंठास गेले. जेथून त्यांनीं सदेह वैकुंठीं गमन केलें, तें देहू येथील गोपाळपुरा नांवाचें स्थान विशेष प्रसिद्ध असून तेंच यात्रेचें मुख्य ठिकाण आहे. तुकारामाचे वंशज हल्लीं देहूस असून त्यांस देवस्थानाच्या खर्चाकरितां तीन गांवें इनाम आहेत.

**नंदुरबार**:—तापी व्हॅली रेल्वेच्या नंदुरबार स्टेशनापासून जवळच हजरत सैय्यद अलाउद्दीन नांवाच्या मुसलमान अवलियाचा एक दर्गा असून, मोहरमच्या १२ व्या तारखेस ह्या पिराचा मोठा उरूस भरतो. हे अवलिया इ. स. ६१२ मध्यें शहीद झाले. पूर्वी नदा नांवाचा यादव वंशीय हिंदु गवळी राजा नंदुरबार येथें राज्य करीत होता. त्याच्यावर मुसलमानांनीं जी स्वारी केली तींत सैयद अलाउद्दीन हे अवलिया होते. राजानें त्यांचें शीर तोडिलें, तरी त्यांचें धड लढत राहून त्यानें मुसलमानांना विजय मिळवून दिला! जय मिळाल्यावर सदरहू अवलियांचें शीर नंदुरबारचे नैऋत्येस एका टेकडीवर नेऊन पुरण्यांत आलें व त्या ठिकाणीं दर्गा बांधण्यांत आला.

**नरसोबाची वाडी**:—ही कोल्हापूर संस्थानांत असून, पचगंगा व कृष्णा या दोन नद्यांच्या संगमावर ती वसली आहे. मिरज-कोल्हापूर रेल्वे फांट्यावरच्या शिरोळ स्टेशनापासून हें नऊ मैलांच्या अंतरावर आहे. श्रीपाद श्रीवल्लभ म्हणून लोक ज्यांना दत्तात्रेयाचा प्रथमावतार समजतात ते तेथें झाले असें म्हणतात. येथील दत्ताच्या पादुकांची सेवा करण्याकरितां हजारो लोक येतात. भूतबाधा व कुष्टरोग जातो अशा समजुतीनें बरेच लोक येथें नेहमीं राहतात. ह्या क्षेत्रास पूर्वी अमरपूर असें म्हणत. प्रसिद्ध साधु नृसिंह-सरस्वती हे येथें सुमारे एक तप राहिले; म्हणून ह्या स्थानास नृसिंहवाडी किंवा नरसोबाची वाडी असें म्हणू लागले. गुरुचरित्र ग्रंथांत या क्षेत्राचें बरेंच वर्णन आहे. या स्थानाला चांगलें उत्पन्न असून, त्यांतून गुरुद्वादशीला म्हणजे अश्विन वद्य द्वादशीला अन्नदान केलें जातें.

**नागपूर शहर**:—हें जिल्ह्याचें तसेंच मध्य प्रांताचें मुख्य ठिकाण असून, त्याची लोकसंख्या सुमारे दोन लाख आहे. हें नाग नदीच्या कांठीं

वसल्यानें त्याला नागपूर हें नांव मिळालें आहे. भोंसल्यांच्या कारकीर्दीत या शहराची भरभराट पुष्कळ झाली व आजहि हें राजधानीचें शहर असल्यानें त्याची वाढ दिवसानुदिवस होतेच आहे. संत्री, कापूस व मँगेनिझच्या व्यापारामुळें या शहरांत अनेक जातींचे व धर्मांचे लोक येऊन राहिले आहेत. मध्यप्रांताच्या मागासलेपणाच्या खुणा शहरांत व लोकांच्या वागणुकींत दिसल्या, तरी नागपूर शहर हें झपाट्यानें पुरोगामी व सुधारणावादी बनत चाललें आहे. शहरांत बऱ्याच कापडाच्या गिरण्या व शिक्षणसंस्था आहेत. नागपूर युनिव्हरसिटीची इमारत याच शहरांत आहे. सीताबर्डीचा किल्ला, गोंड राजाचा किल्ला, टाऊन हॉल, सकरदरा, पशुपक्षीसंग्रहालय, जुम्मा तलाव, तेलंगखेडी तलाव, हीं स्थळें प्रेक्षणीय आहेत.

**नांदेड शहर**:—हें नांदेड जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून तें गोदावरीच्या उत्तर तीरावर वसलें आहे. येथील लोकसंख्या सुमारे पंचवीस हजार आहे. येथें पूर्वी शहाजहानच्या वेळेस तैलंगणची राजधानि होती. येथें सरकारी कचेऱ्या, शाळा, दवाखानें व पोस्ट ऑफिसें आहेत. नांदेड हें मलमल, जरीकांठी लुगडीं व उपरण्यांकरितां प्रसिद्ध आहे. येथें कलमच्या राजानें बांधलेला किल्ला असून, त्यांत हल्लीं तुरुंग आहे. शिखांचा दहावा गुरु गोविंद याचे समाधि येथें असल्यानें, शिखांची हें मोठें यात्रास्थान आहे.

**नाशिक**:—हें शहर गोदावरीच्या दोन्ही तीरांवर वसले असून, पूर्व तीरावर पंचवटी क्षेत्र आहे. पश्चिम तीराच्या दक्षिणेकडे जुनें नाशिक (गुलशनाबाद) असून, उत्तरेकडे नवें नाशिक आहे. जुन्या नाशिकचा उल्लेख भर्हुत येथील चैत्यावरील शिलालेखांत (इ. स. पूर्वी २०० वर्षें) व पांडवलेण्यांतील शिलालेखांत (खि. पू. १५० वर्षें) आलेला आहे. याच्या आसपास नऊ टेंकड्या असून, याचें मूळ नांव नवशिख असावें. द्वापारयुगांत ह्यास जनस्थान म्हणत व ह्या जनस्थानाचा उल्लेख रामायणांत आहे. टॉलेमीनें (इ. स. १५०) ह्याचा नासिकाया ह्या नांवानें निर्देश केला आहे. वराहमिहिराच्या बृहत्संहितेंत नाशिक हें नांव आढळतें. पेशव्यांच्या आप्तांनीं

व सरदारांनीं बांधिलेलीं देवळें येथें बरीच असून, तीं प्रेक्षणीय आहेत. शिल्प-कलेच्या दृष्टीनें पंचवटींतील रामाचें देऊळ, नारोशंकराचें देऊळ, सुंदरनारायणाचें देऊळ हीं विशेष सरस आहेत. नाशिकाच्या जवळ असलेलीं 'पांडव लेणीं' अत्यंत प्रेक्षणीय असून, तीं खि. पू. पहिल्या शतकापासून खिस्तोत्तर चवथ्या शतकापर्यंत तयार झालेलीं आहेत यांतील शिलालेख फार चांगल्या स्थितींत आहेत. चांभारलेणीं गांवाजवळच असून, त्यांत जैन पंथीय तीर्थंकरांच्या मूर्ति आहेत. शहराची हवा थंड व निरोगी आहे.

**निर्मळ**:—हें स्थान ठाणें जिल्ह्यांत वसईपासून सहा मैलांवर आहे. येथें फार प्राचीनकाळीं विमल नांवाचा राक्षस राहात असे. परशुरामानें त्याचा वध केला म्हणून या क्षेत्रास निर्मळ हें नांव मिळालें. या ठिकाणीं विमल व मिर्मळ अशीं दोन तीर्थें आहेत. ह्या तीर्थांच्या कांठीं शंकराचें स्वयंभू स्थान आहे. पोर्तुगीझ लोकांनीं हीं तीर्थें भ्रष्ट केलीं असतां, इ. स. १७३९ सालीं चिमणाजी अप्पानें वसई काबीज केल्यावर पेशव्यांचा वसई प्रांताचा सरसुभेदार शंकराजी केशव ह्यानें तीं शुद्ध करून तेथें घाट व देवळें बांधिलीं. जवळच्या उंच टेकडीवर शंकराचार्यांची म्हणून जी समाधि दाखविण्यांत येते ती आद्य शंकराचार्यांनंतरच्या आचार्यांपैकीं कोणाची तरी असावी.

**पन्हाळगड**:—हा कोल्हापूर शहराच्या वायव्येस बारा मैलांवर असून तो इ. स. ११९० च्या सुमारास शिलाहार वंशांतील दुसऱ्या भोजराजानें बांधिला. व इ. स. १२०८ च्या सुमारास यादव वंशांतील सिंघण राजानें मजबूत केला. किल्ल्याचा घेर ४॥ मैल असून उंची समुद्र-सपाटीपासून सुमारे २७०० फूट आहे. किल्ल्यावर मुबलक पाणी, सुपीक जमीन व दाट झाडी आहे.

**पंढरपूर**:— हें सोलापूर जिल्ह्यांत भीमानदीच्या काठीं असून बार्शी लाइट रेल्वेचें एक स्टेशन आहे. पंढरपूरला दक्षिणद्वारका म्हणण्याची प्रथा आहे. महाराष्ट्रांतील वारकरी संप्रदायाचें मुख्य दैवत विठ्ठल किंवा

पांडुरंग यांचें देऊळ येथें असून, दरवर्षी आषाढी-कार्तिकी एकादशीच्या निमित्तानें व येरव्ही देखील येथें लाखो लोक यात्रेकरितां म्हणून येतात. विठोबाची मूर्ति फार प्राचीन असून ती काळ्या पाषाणाची, साडेतीन फूट उंचीची व तिसऱ्या शतकांतील भिलसा जवळील उदयगिरी लेण्यांतील मूर्तिप्रमाणें दिसते ! देवळांतील सर्वांत जुना शिलालेख शके ११५९ मधील आहे. सर्वांत जुनें शिल्पकाम नामदेव दरवाज्याचें आहे. येथेंच शके १२७२ आषाढ शुद्ध त्रयोदशीस पंढरपुरास देवद्वारीं नामदेवानें समाधि घेतली. ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, एकनाथ, तुकाराम यांच्या अभंगांतून पंढरपूर व विठोबा यांचा भक्तिपूर्वक वारंवार उल्लेख आला आहे. पंढरपूरजवळ भीमा नदीला चंद्राच्या कोरीसारखा आकार असल्यानें तिला चंद्रभागा येथें म्हणतात. चंद्रभागेच्या पैलतीरावरून संध्याकाळचें वेळीं पंढरपूर शहराचें दृश्य रमणीय दिसतें. नदीच्या वाळवंटांत संध्याकाळीं जागोजागीं कीर्तनें होत असतात. व त्यावेळचें वातावरण पवित्र वाटतें. येथील लोकसंख्या सुमारे पसतीस हजार आहेत. येथें एक हायस्कूल, एक औद्योगिक शिक्षणाची शाळा व अनाथबालसंगोपनगृह आहे.

**परशुराम :—** हें क्षेत्र रत्नागिरी जिल्ह्यांत चिपळूण पासून तीन मैलांवर लहान टेकडीवर असून, तेथें परशुराम व त्याची आई रेणुका ह्यांचीं देवळें आहेत. विष्णूच्या दहा अवतारांपैकीं परशुराम हा एक अवतार असून, त्यानें समुद्रावर बाण मारून सह्याद्रीपर्यंत पसरलेलें समुद्राचें पाणी पश्चिमेकडे हटविलें व नवीन जागा निर्माण केली. या जागेस परशुराम क्षेत्र असें म्हणतात. परशुरामाचें देवस्थान फार प्राचीन असून, पहिल्या बाजीरावाचे गुरु धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांनीं ह्या देवळाचा जीर्णोद्धार केला. ह्या देवळाजवळ एक झरा आहे. त्यास बाणगंगा म्हणतात. दरवर्षी वैशाखांतील अक्षय्यतृतीयेस परशुराम जयंतीनिमित्त येथें मोठा उत्सव होतो. देवस्थानास १५०० रुपयांचें वर्षासन असून सर्व व्यवस्था पंचांमार्फत चालते.

**परळीवैद्यनाथ :**—हैद्राबाद संस्थानच्या बीड जिल्ह्यांतील अंबा तालुक्यांत हें गांव आहे. परभणीपासून चौदा कोस दक्षिणेस किंवा अंबा जोगाईपासून सात कोस ईशान्येस हें क्षेत्र आहे. गांवाबाहेर भगवद्भक्त जगमित्र नागाचें स्थान व रामाचे तीन मठ आहेत. काळ्या रामाच्या देवालयांत एका खांबावर पत्रा असून त्यावर लेख कोरला आहे. वैद्यनाथ हे बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक असून, त्याचें येथें प्रचंड देवालय आहे. भोंवतालीं मार्कंडेय, हरिहर इत्यादि मोठालीं तीर्थें आहेत. पेशव्यांनीं या गांवाच्या समस्त ब्राह्मणांना ४४ चाहूर जमीन (५२८० बिघे) इनाम दिलेली आहे. वैद्यनाथाच्या देवालयांत एक शिलालेख आहे. शके १७०६ मध्यें अहिल्याबाईनें या मंदिराचा जीर्णोद्धार केला.

**प्रतापगड :**—महाबळेश्वरापासून बारा मैलांवर हा किल्ला असून त्याची उंची समुद्र सपाटीपासून ३५४३ फूट आहे. चंद्रराव मोऱ्यांचें जावळीचें राज्य घेतल्यावर शिवाजी महाराजांनीं हा किल्ला इ. स. १६५६ मध्यें बांधिला. याच किल्ल्याच्या पायथ्याशीं शिवाजी-अफझुलखानांची सुप्रसिद्ध भेट होऊन अफझुलखान मारला गेला. इ. स. १६६१ मध्यें महाराजांनीं येथें भवानी देवीचें देऊळ बांधिलें. देवीची मूर्ति काळ्या पाषाणाची असून सुंदर आहे.

**प्रवरासंगम-टोकें ( नेवासें )**—अहमदनगर जिल्ह्यांतील नेवासें गांवाच्या ईशान्येस सात मैलांवर असलेल्या टोकें गांवीं गोदावरी व प्रवरा या दोन नद्यांचा संगम असून तो फार पवित्र मानतात. सिंहस्थांत येथें मोठी यात्रा भरते. टोकें गांव पेशवाईत फार भरभराटीचा असून त्यावेळीं येथें घाट व वाडे बांधिले गेले. नाना फडणविसाचा घाट व वाडा गांवाच्या पश्चिमेस आहे. टोकें गांवांत सिद्धेश्वराचें स्वयंभू स्थान असून, त्याचें देऊळ गद्रे नांवाच्या श्रीमंत सरदारांनीं १३००० रु. खर्चून बांधिलें असें म्हणतात. या देवळाच्या भिंतींवर त्या काळच्या शिल्पकारांच्या कोशल्याचें अप्रतिम नमुने आहेत. देवळाच्या पुढच्या बाजूस असलेली दशावताराचीं चित्रें,

डाव्या बाजूस असलेले मत्स्यभेद व रुक्मिणीस्वयंवर व उजव्या बाजूचीं कृष्ण व गोपी यांचीं चित्रें फारच प्रेक्षणीय आहेत.

**पुणें**:—हें शहर शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत प्रथम लोकांच्या नजरेसमोर आलें. दहाव्या शतकांतील राष्ट्रकूटांच्या एका ताम्रपटांत याचें पूनकवाडी असें नांव आहे. शहाजीला अहमदनगर व विजापूर ह्या दरबाराकडून मिळालेल्या जहागिरींत पुण्याचा समावेश होत होता. राजगड घेईपर्यंत शिवाजीचें ठाणें पुण्यासच होतें. थोरल्या बाजीरावानें पुणें हें आपलें मुख्य ठिकाण केलें. नानासाहेब पेशवे व सवाई माधवराव ह्यांच्या कारकीर्दींत पुणें शहर वैभवाच्या शिखरावर पोंचलें होतें साम्प्रत पुणें ही मुंबई सरकारची नंबर दोनची राजधानी असून, जून ते ऑक्टोबर पर्यंत सरकारचें ठाणें येथें असतें. शहराची वाढ झपाट्यानें होत असून, लोकसंख्या सुमारें तीन लाख आहे. येथें असलेल्या शेकडों शिक्षणसंस्थांमुळें, पुणें हें महाराष्ट्रांतील पहिल्या श्रेणीचें शिक्षणकेंद्र समजलें जातें. लोकमान्य टिळकांच्या मृत्युपर्यंत तें राजकीय दृष्ट्याहि प्रमुख शहर समजलें जाई. शहरांतील अनेक संस्था प्रेक्षणीय असून, त्याशिवाय शनिवारवाडा, नानावाडा, पर्वती, वानवडी हीं स्थळें ऐतिहासिक दृष्ट्या महत्वाचीं आहेत. हें शहर समुद्रसपाटीपासून १८५० फुट उच असून, येथील हवा सामान्यपणें थंड व निरोगी आहे.

**पुरंदर** :—हा किल्ला पुणें जिल्ह्यांत सासवडपासून सहा मैलांवर एका डोंगरावर आहे. त्याची उंची समुद्रसपाटीपासून ४५६४ फूट आहे. शिवाजीचा आजा मालोजी भोंसले ह्याला ज्यावेळीं पुणें व सुपें प्रांतांची जहागिरी मिळाली, त्यावेळीं त्याला हा किल्ला मिळाला. शिवाजीनें हा किल्ला १६६५मध्यें जिंकून घेतला. छत्रपति संभाजी व सवाई माधवराव यांचा जन्म याच किल्ल्यावर झाला. इंग्रज व पेशवे यांच्यांतील सुप्रसिद्ध पुरंदरचा तह येथेंच झाला. किल्ल्यावरील सपाट जागेवर सध्या इंग्लिश फौजेची छावणी आहे. पूर्वींचें वाडे, देवालयें, धान्य व दारूगोळयाचीं कोठारें यांचे अवशेष किल्लावर दिसतात.

**पैठण** :—हैदराबाद संस्थानच्या औरंगाबाद जिल्ह्यांत हें तालुक्याचें ठिकाण आहे. सुप्रसिद्ध भागवतसंप्रदायी एकनाथांच्यामुळें पैठणाला गेल्या तीन-चारशें वर्षांपासून यात्रेचें ठिकाण म्हणून महत्व आलें असलें, तरी फार प्राचीन कालापासून हें शहर प्रसिद्ध आहे. पूर्वी यांस प्रतिष्ठान म्हणत. पुलुमायी दुसरा, त्या आंध्रराजाची (खि. पू. १७०-१३८) ही राजधानि होती. उत्तमपैकीं सुतारकाम केलेलीं देवालयें येथें आहेत. येथें एकनाथ महाराजांची समाधि आहे. पैठण हें रेशमी पैठण्या व सुती लुगड्यांबद्दल प्रसिद्ध आहे. गांवाजवळून गोदावरी नदी वाहते. गांवाची लोकसंख्या सुमारें दहा हजार आहे.

**भंडारा** :—हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून तें बंगाल नागपूर रेल्वेच्या भंडारारोड स्टेशनापासून ७ मैलांवर आहे. तें वैनगंगा नदीकांठीं वसलें आहे. गवळयांनीं बांधलेला एक जुना किल्ला येथें आहे. येथें पितळेची भांडीं व रेशमी कापड हीं चांगलीं होतात.

**भीमाशंकर** :—पुणें जिल्ह्याच्या खेड तालुक्यांत हें सह्याद्रि पर्वतावरें ३४४८ फूट उंचीचें शिखर आहे. येथें भीमा नदीचा उगम आहे. येथें जवळच भोवरगिरीचा किल्ला व महादेवाचें देऊळ आहे. हें देऊळ नाना फडणविसांनीं बांधिलें आहे. भीमाशंकराच्या यात्रेला बरेच लोक येतात. येथील शिवलिंग बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक मानलें जातें. अयोध्येचा राजा भीमक याच्या प्रार्थनेवरून शंकरानें त्रिपुरासुराला मारल्यानंतर आपल्या शरीराला आलेल्या घामापासून भीमा नदी उत्पन्न केली अशी दंतकथा आहे.

**क्षेत्रमहाबळेश्वर** :—सुप्रसिद्ध महाबळेश्वर ह्या हवाखाण्याच्या ठिकाणापासून हें क्षेत्र तीन मैलांच्या अंतरावर असून, येथून कृष्णा, कोयना व वेण्णा या नद्या उगम पावतात. येथें महाबळेश्वर, अतिबळेश्वर व कृष्णाबाई ह्यांचीं फार जुनीं देवळें आहेत. कृष्णाबाईचें देवालय एखाद्या वाड्याच्या चौकाप्रमाणें दिसतें. देऊळ काळ्या दगडाचें असून मजबूत आहे. ह्याच देवळांत कृष्णानदी उगम पावते असें मानतात. ह्या देवळाशिवाय येथें एक

हेमाडपंती घाटणीचें देऊळ आहे. येथें बरेच लोक यात्रेच्या निमित्तानें येतात.

**मलंगड—कल्याण** :—ठाणें जिल्ह्यांतील कल्याणपासून दहा मैलांवर हा डोंगरी किल्ला असून, किल्ल्याच्या खालच्या बाजूस डोंगरावरील सपाट जागेवर हजरत बाबा मलंग ह्या अवलियाची कबर आहे. येथें माघ शुद्ध पौर्णिमेस मोठा उरूस भरतो. ह्या कबरीचा मुजावर ब्राम्हण आहे व येथील उरूसास हिंदुहि येतात. ह्या किल्ल्यावर सातशे वर्षांपूर्वी नळ नांवाचा हिंदु राजा राज्य करीत असतांना, अरबस्तानांतून हाजी अब्दुर्रहमान नांवाचे एक अवलिया येऊन किल्ल्याच्या एका भागांत राहू लागले. राजानें त्यांची अनेक प्रकारें परीक्षा घेऊन शेवटीं त्यांस तेथें राहू दिलें. हे अवलिया मलंगपंथी होते. ते वारल्यावर गडावर त्यांची कबर बांधण्यांत आली. हा किल्ला मराठ्यांकडून जेव्हां इंग्रजांनीं जिंकून घेतला तेव्हां त्यांना त्या किल्ल्यावर दोन वर्षांपेक्षां जास्त काळ राहतां आलें नाहीं तें मलंगबाबांच्या दैवी सामर्थ्यामुळें होय असें पेशव्यांनीं मानून त्या साधूच्या कबरीवर घालण्यास एक बहुमूल्य वस्त्र पाठविलें. तें वस्त्र कल्याण येथील काशिनाथपंत केतकर ह्या ब्राम्हण गृहस्थानें त्या कबरीवर नेऊन घातलें. तेव्हांपासून कबरीची व्यवस्था त्यांच्या वंशजांकडेसच चालू आहे.

**मालेगांव** :—मोक्षगंगा नदीच्या कांठीं असलेला मालेगांवांतील हा भुईकोट किल्ला पेशवाईतील नारोशंकर राजे बहाद्दर यांनीं इ. स. १७६५ मध्यें बांधिला. किल्ला बांधण्यास नऊ वर्षें लागलीं. किल्ल्याला नऊ दरवाजे असून, तो आकारानें चौकोनी आहे. त्याला तीन तट असून तिसऱ्या तटाच्या आंत खोल खंदक आहे. याच्या बळकटीमुळें त्याला खानदेशची किल्ली असें म्हणत. किल्ल्याचा बहुतेक भाग हल्लीं पडून गेला असून, कांहीं तट व बुरुज फक्त शिल्लक आहेत.

**माहुली** :—हें क्षेत्र सातारा शहराच्या पूर्वेस तीन मैलांवर कृष्णा आणि वेण्णा ह्या नद्यांच्या संगमावर आहे. ह्या गांवाचे दोन भाग असून कृष्णेच्या पश्चिम तीरावरील भागास संगममाहुली म्हणतात. हें औंधकरांच्या

ताब्यांत आहे. पूर्वतीरावरील भागास क्षेत्र माहुली म्हणतात. ती ब्रिटिश हद्दींत आहे. माहुलीस कन्यागतांत मोठी यात्रा भरते. कृष्णेच्या पश्चिम तीरावर येथें पुष्कळ देवळें व घाट आहेत. गिरिघाट नांवाचा घाट बाबू-भट्ट बिन गोविंदभट्ट या गृहस्थानें इ. स. १७८० च्या सुमारास बांधिला असें म्हणतात. घाटावरील शंकराचें देऊळ पंतप्रतिनिधींच्या घराण्यांतील ताईसाहेब नांवाच्या स्त्रीनें इ. स. १८२५ त बांधिलें.

**मुरुड जंजिरा**–हा किल्ला जंजिरा संस्थानांतील इंडाराजपुरी खाडीच्या तोंडाशीं समुद्रांतील एका खडकावर बांधिलेला आहे. त्याच्या उत्तरेस किनाऱ्यावर मुरूड हें गांव आहे. हा जलदुर्ग प्राचीन असून, तो पूर्वीच्या हिंदुराजांकडून अहमदगरच्या बादशहानें इ. स. १४९० मध्यें जिंकून घेतला. पुढें त्या बादशहानें किल्ल्यावर शिद्दी जातीचे सुभेदार नेमले. हे पुढें स्वतंत्र झाले व तेव्हांपासून आजतागाईत किल्ला त्यांच्या वंशजांकडे आहे. हा किल्ला जिंकण्याचे शिवाजी महाराजांनीं दोनदां प्रयत्न केले पण त्यांना त्यांत यश आलें नाहीं. किल्ल्याचा तट पन्नास फूट उंच असून, त्यास एकोणीस बुरुज आहे.

**रत्नागिरी शहर**:—हें रत्नागिरी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून येथील हवा आरोग्यदायक आहे. लोकसंख्या सुमारे तीस हजार आहे. येथें कलेक्टर डिस्ट्रिक्ट जज यांच्या कचेऱ्या असून दोन हायस्कुलें एक कॉलेज व बऱ्याच मराठी शाळा आहेत. येथील किनाऱ्याजवळील किल्ला व भगवतीचें देऊळ हीं प्रेक्षणीय आहेत. इ. स. १८६७ सालीं येथें एक दीपगृह बांध-ण्यांत आलें. ब्रह्मदेशचा राजा थीबा याला येथें बरीच वर्षें ठेवण्यांत आलें होतें.

**राजापूर**:—हें रत्नागिरी शहरापासून ३० मैल उत्तरेकडे आहे. हें शहर कोंकणांत अत्यंत जुनें व प्रेक्षणीय असें आहे. शहरापासून एक मैलावर एक ऊन पाण्याचा झरा आहे. या झऱ्यापासून एक मैलावर दुसरा एक झरा आहे. तो कधीं कधीं वाहतो. त्यावेळीं गंगा आली असें मानून कोंकणांतील हजारो लोक येथें यात्रेकरितां येतात. शहराच्या मध्यभागीं एक

विठोबाचें देऊळ आहे. तेथें वर्षांतून दोन वेळ यात्रा भरते. येथील आकस्मिक गंगाप्रवाह म्हणजे नैसर्गिक वक्रनलिका यंत्राचें (सायफनचें) कार्य होय असें शास्त्रज्ञ मानतात.

**रामटेक:**—हें यात्रेचें ठिकाण नागपूर जिल्ह्याच्या रामटेक तहशिलीचें मुख्य ठिकाण असून, तें नागपूर शहरापासून ईशान्येस ३० मैलांवर आहे. नागपूरहून रामटेकला जायला मोटरी भाड्यानें मिळतात. हें शहर अंबागड पर्वताच्या ओळींपैकीं एका टेकडीच्या पायथ्याशीं आहे. टेकडीवर पुष्कळ जुनीं देवळें आहेत. सर्वांत मुख्य देऊळ रामचंद्राचें आहे. शहराभोंवतीं पुष्कळ तळीं असून, त्यांत खिणशीचें तळें मोठें व प्रेक्षणीय आहे. रामटेक येथें पौष आणि फाल्गुन महिन्यांत यात्रा भरते. रामटेक हे जुन्या देवळांकरितां जसें प्रसिद्ध आहे, तसेंच ते विड्याच्या पानांच्या व संत्र्यांच्या बागांकरितांहि सुप्रसिद्ध आहे. शहराच्या जवळच मँगेनीझच्या खाणी असल्यामुळें तर या शहराचें महत्त्व फारच वाढलें आहे.

**रायगड:**—कुलाबा जिल्ह्यांतील महाडपासुन सोळा मैलावर हा किल्ला आहे. ह्याची उंची समुद्रसपाटीपासून २८५१ फूट आहे. पूर्वी ह्याला रायरीचा किल्ला म्हणत. चंद्रराव मोऱ्यापासून शिवाजी महाराजांनीं हा किल्ला जिंकून घेऊन मजबूत केला. कोंकण व देश ह्यांमध्यें हा असल्यानें शिवाजीनें हेंच आपल्या राजधानीचें ठिकाण केलें. इ. स. १६७४ मध्यें येथेंच महाराजांना राज्याभिषेक झाला व इ. स. १६८० मध्यें येथेंच ते कालवश झाले. हल्लीं गडावर शिवाजीच्या वाड्याचे व राजस्त्रियांच्या महालाचे अवशेष आणि गंगासागर तलाव हीं दिसतात. त्याशिवाय नवीन बांधलेली शिवाजी महाराजांची अष्टकोनी समाधि असून, तिच्या जवळच महाराजांच्या आवडत्या कुत्र्याची लहानशी समाधि आहे. महाराजांचें प्रेत जळत असतां त्या स्वामिभक्त कुत्र्यानें चितेंत उडी घेतली अशी आख्यायिका आहे.

**वज्रेश्वरी (वज्राबाई):**—ठाणें जिल्ह्यांतील भिवंडी तालुक्यांत हें

देवीचें ठिकाण आहे. या ठिकाणीं पुष्कळ उन्हाळीं किंवा ऊन पाण्याचीं कुंडें आहेत. पाण्याला गंधकाचा वास येतो, त्यावरून या जागेच्या खालीं भूगर्भांत गंधकाच्या खाणीं असाव्यात. दंतकथा अशी आहे कीं, देवीनें वज्राबाईचा अवतार घेऊन राक्षसाला ठार मारिलें. देवीचें देवालय प्रेक्षणीय असून, तेथें चैत्रांत यात्रा भरते. देवळांत वज्रेश्वरी, कालिका व रेणुका ह्यांच्या तीन काळ्या पाषाणाच्या भव्य मूर्ति आहेत. त्यांतील मधील मूर्तीच्या हातांत वज्र आहे, म्हणून तिला वज्रेश्वरी असें म्हणतात. देवीचें देऊळ वसई काबीज केल्यावर चिमाजी अप्पा पेशवे यांनीं नवसाप्रीत्यर्थ बांधविलें. जवळच अकोली व गणेशपुरी येथेंहि उन्हाळीं असून, तेथील पाण्याची उष्णता १२० डिग्रीइतकी असते. हें पाणी औषधिक दृष्ट्या फार महत्त्वाचें आहे.

**वसई** :—हा सुप्रसिद्ध किल्ला वसई गांवापासून एक मैलावर असून तो गुजरातचा सुलतान महंमद बेगडा यानें १४७० च्या सुमारास बांधिला. पुढें हा पोर्तुगीझ लोकांच्या ताब्यांत आल्यावर त्यांनीं तो मजबुत करून, त्यावर प्रचंड इमारती बांधिल्या. पोर्तुगीझांच्या ताब्यांत हा सुमारें दोनशें वर्षें असून तो अभेद्य समजला जाई. इ. स. १७३९ मध्यें बाजीराव पेशव्याचा भाऊ चिमाजीअप्पा ह्यानें वेढा देऊन हा किल्ला पोर्तुगीझांपासून जिंकून घेतला. किल्ल्याच्या तिन्ही बाजूस समुद्र असून चौथी बाजू किनाऱ्यास लागलेली आहे. किल्ल्याचा तट शाबूत असून, त्याची उंची ३० फूट व घेर दीडमैलाचा आहे. आंत पडक्या इमारतींचे, प्रार्थनामंदिरांचे व थडग्यांचे अवशेष दिसतात.

**वाई** :—वाई हें क्षेत्र कृष्णानदीच्या कांठीं वसलें असून ते सदर्न मराठा रेल्वेच्या वाठार स्टेशनापासून वीस मैलांवर आहे. वाई हीच विराटनगरी असून तेथें पांडव अज्ञातवासांत राहात होते असें म्हणतात. वाई हें जरी प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलें, तरी त्याला खरें वैभव पेशवाईतच प्राप्त झालें. सरदार रास्ते यांनीं हजारो रुपये खर्चून विस्तीर्ण

घाट व भव्य मंदिरें, धर्मशाळा, वाडे वगैरे बांधून ह्या क्षेत्राचें महत्त्व वाढविलें. घाटावर व गांवांत अनेक देवळें आहेत. त्यांत ढोल्या गणपति, विष्णु व लक्ष्मी ह्यांचीं देवळें प्रेक्षणीय आहेत. कृष्णेच्या कांठच्या घाटाची व त्या वरील देवळांची शोभा फारच सुंदर दिसते. येथील प्राज्ञ पाठशाळा ही संस्था महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे.

**विजयदुर्ग :**—विजयदुर्ग बंदराजवळ एका उंच टेकडीवर हा किल्ला असून तो फार प्राचीन आहे. शिवाजी महाराजांनीं तो विजापूरकरांकडून जिंकून व त्याच्या भोंवतीं मजबूत तट व जागोजागीं भव्य बुरुज उभारून, त्यांनीं आपल्या आरमाराचें हें मुख्य ठिकाण बनविलें. इंग्रज, फ्रेंच, डच यांनीं किल्ला जिंकण्याचा खूप प्रयत्न केला. पण त्यांत त्यांना यश मिळालें नाहीं. सरदार आंग्रे प्रबळ बनून किल्ल्यावर स्वत:ची मालकी सांगू लागतांच, पेशव्यांनीं इंग्रजांच्या मदतीनें हा किल्ला १७५६ मध्यें सर केला. पेशवाई नष्ट झाल्यावर तो इंग्रजांच्या ताब्यांत आला. किल्ल्यांत उत्तम पाण्याच्या विहिरी व वस्ती करण्यासारख्या जुन्या इमारती आहेत.

**संजाण :**—मुसलमानांच्या जाचाला कंटाळून पारशी लोकांनीं ज्यावेळीं आपली मातृभूमि इराण ही सोडून हिंदुस्थानांत आगमन केलें (इ.स. ६९८) त्यावेळी प्रथम त्यानीं काठेवाडाजवळील दीव बेटांत प्रवेश केला. तेथे १९ वर्षें राहिल्यावर ते हिंदुस्थानांत यावयास निघाले व प्रथम ठाणें जिल्ह्यांतील संजाण बंदरांत त्यांनीं आपले पाय ठेवले. त्या घटनेच्या स्मृत्यर्थ संजाण येथें एक खूप उंच स्तंभ उभारण्यांत आला असून, त्यावर पारशी लोकांच्या आगमनाची सर्व हकिकत कोरण्यांत आली असून, अगदी टोकावर अग्नीचें प्रज्वलित कुंड दाखविण्यांत आलें आहे.

**सज्जनगड :**—सातारच्या पश्चिमेस सहा मैलांवर परळी नांवाचा एक जुना डोंगरी किल्ला असून तो शिवाजी महाराजांनीं इ. स. १६७३ सालीं जिंकून घेतला. येथें पुढें श्रीसमर्थ रामदासस्वामी ह्यांनीं आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. रामदासस्वामी येथें राहूं लागल्यापासून

त्यांच्या दर्शनास अनेक सज्जन येऊं लागले. तेव्हांपासून परळीच्या किल्ल्यास सज्जनगड हें नांव पडलें. असें कित्येक म्हणतात. स्वामींनीं याच किल्ल्यावर वयाच्या ७३ व्या वर्षी माघ वद्य ९ शके १६०३ मध्यें समाधि घेतली. सज्जनगडावर स्वामींनीं बांधिलेलें रामाचें देऊळ असून त्यांतील राम, लक्ष्मण व सीता ह्यांच्या मूर्ति पंचरसी धातूच्या आहेत. ह्या देवळाच्या गाभाऱ्याच्याच खालीं तळघरांत रामदासस्वामींची समाधि आहे. देवळाच्या जवळच्या खोलींत रामदासस्वामी वापरीत असलेल्या कांहीं जिनसा जपून ठेविल्या आहेत.

**सप्तशृंग** :—नाशिक जिल्ह्यांतील वणी गांवाजवळ सप्तशृंग नांवाचें ४६५९ फूट उंचीचें सह्याद्रीचें एक शिखर असून, त्यावर देवीचें प्राचीन स्थान आहे. सदरहू देवीचें वर्णन सप्तशती नांवाचे ग्रंथांत आहे. ही देवी महाराष्ट्रांतील अनेक घराण्यांचें कुलदैवत आहे. येथें चैत्री पौर्णिमा व अश्विनी पौर्णिमा या दिवशीं यात्रा जमते. सप्तशृंग डोंगराची चढण फार कठीण आहे. वणी गांवापासून दीड कोस चढून गेल्यावर खडकांत कोरलेल्या ३५० पायऱ्या लागतात. यानंतर डोंगर सपाटी लागते येथेंच गणपतीचें देऊळ, तीर्थांचीं कुंडें, धर्मशाळा, तलाव वगैरे आहेत. ह्या सपाटीच्या पुढें ७५० पायऱ्या चढून गेल्यावर एका उंच सरळ कड्याच्या पायथ्याशीं लहानशा गुहेंत देवीची आठ फूट उंचीची, अठरा भुजांची, सिंदूरचर्चित भव्य मूर्ति दृष्टीस पडते. ह्या देवीस पहिल्या बाजीराव पेशव्यांनीं इनाम दिलेला चणकापूर गांव तिच्याकडे चालू आहे.

**सातारा** :—हें शहर शिवाजीनें इ. स. १६७३ मध्यें विजापूरच्या बादशहाकडून जिंकून घेतलें. राजारामानें हें आपल्या राजधानीचें ठिकाण केलें. इ. स. १८४८ मध्यें हें संस्थान इंग्रजांनीं खालसा केलें. येथील शहाजी राजानें सन १८४५ त बांधलेला राजवाडा प्रेक्षणीय आहे. त्यांतील दिवाण-खाना खूपच भव्य आहे. शहराजवळ अजिमतारा नांवाचा किल्ला आहे. हा किल्ला दुसऱ्या शिलाहार भोजानें पन्हाळगड किल्ल्याच्या बांधणीच्या सुमारास

बांधिला. शिवाजीनें हा किल्ला १६७३ घेतला. औरंगजेबाला त्याचा मुलगा अजिमशहा याच्या मदतीनें हा किल्ला जिंकता आला (इ. स. १६९९) म्हणून त्यानें याचें नांव अजिमतारा ठेविलें. किल्लयाचा आकार तिकोनी असून, तो अजून चांगल्या स्थितींत आहे.

**सासवड** :—पुण्याच्या आग्नेय दिशेस २० मैलांवर हें इतिहास-प्रसिद्ध स्थान कऱ्हा नदीच्या कांठावर आहे. येथें महाराष्ट्रांतील संतांपैकीं सोपानदेव ह्यांची समाधि कऱ्हा व चांबळी ह्या नद्यांच्या सगमापासून थोड्याशा अंतरावर आहे. संगमाजवळ संगमेश्वराचें देऊळ आहे. समाधीचा मंडप विस्तीर्ण असून तेथील मधल्या दालनांतील खांबावरील शिल्पकाम फार प्रेक्षणीय आहे. सोपानदेव हें ज्ञानेश्वराचे कनिष्ठ बंधु असून निवृत्तिनाथ हें त्यांचे मोक्षगुरू होत. ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतल्यानंतर सोपानदेवानीं शके १२१९ मार्गशीर्ष शुद्ध १२ च्या दिवशीं समाधि घेतली.

**सिंधुदुर्ग** :—समुद्र किनाऱ्याचा बंदोबस्त चागला करता यावा म्हणून शिवाजी महाराजांनीं हा किल्ला इ. स. १६६४ मध्यें मालवण बंदराच्या पश्चिमेस एका मैलावर कुरटें बेटांत बांधून त्याचें नांव सिंधुदुर्ग ठेविलें. त्याच्या सभोंवतीं समुद्र असून, त्याचा घेर दोन मैलांचा आहे. किल्लयाच्या तटाची उची तीस फूट असून, त्यांत बत्तीस बुरुज आहेत. किल्लयांतील पूर्वीच्या इमारती आतां नष्ट झाल्या आहेत. येथील शिवाजीचें जुनें मंदीर कोल्हापूरच्या शाहू छत्रपतींनीं इ. स. १९०७ मध्यें दुरुस्त करून त्यापुढें एक सभा मंडप बांधिला. मंदिरांत शिवाजीची जुनी दगडी मूर्ति आहे. ह्या मंदिराला कोल्हापूर संस्थानचें १५०० रुपयांचें वर्षासन आहे.

**सिंहगड** :—यास पूर्वी कोंडाणा म्हणत असत. हा किल्ला पुण्या-पासून बारा मैलांवर आहे. त्याची उंची समुद्रसपाटीपासून ४३०० फूट आहे. हा किल्ला तानाजी मालुसऱ्यानें घोरपडीच्या साहाय्यानें कडा चढून व उदयभानूशीं युद्ध करून जिंकला. यांत तानाजी व उदयभानू दोघेहि पडले. शिवाजीमहाराजांना जेव्हां ही बातमी समजली तेव्हा 'गड आला

पण सिंह गेला' असे उद्गार त्यांच्या तोंडून निघाले. तेव्हांपासून शूर तानाजीच्या स्मरणार्थ ह्या किल्लयाला सिंहगड म्हणू लागले. किल्लयावर तानाजीची समाधि, उदयभानूचें थडगें व राजाराममहाराजांची समाधि हीं दिसतात. किल्लयावरून सभोंवतालचें दृश्य फारच रमणीय दिसते. येथील हवापाणी उत्तम आहे.

**सोलापूर**:—सोलापूर शहराच्या दक्षिणेस सिद्धेश्वर नांवाचा तलाव असून, त्याच्या वायव्य कोंपऱ्यावर सिद्धेश्वराचें प्रसिद्ध देवालय आहे. देऊळ लहान असून, त्याच्या मध्यभागीं दगडी चौथऱ्यावर शंकराच्या दोन पिंडी आहेत. हें देवालय सिद्धेश्वर नांवाच्या लिंगायत साधूनें बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बांधिलें. प्रसिद्ध गड्डा नांवाची यात्रा येथें दरवर्षी पौषांत भरते. तलावाच्या दक्षिण तीरावर हजरत शाह जहूरचा घुमट व कबर हीं आहेत. शाह जहूर व त्यांचे पूर्वज महंमद तघलघाबरोबर धर्मप्रसाराकरितां महाराष्ट्रांत आले होते. शाह जहूर ह्यांनीं हिंदूंवर कधीं जुलूम केला नाहीं किंवा त्यांच्या धर्माची निंदा केली नाहीं. त्यामुळें ते मेल्यावर त्यांची कबर त्यांच्या हिंदुमुसलमान शिष्यांनीं हिंदूंच्या पवित्र देवळाजवळच बांधिली. दरवर्षी मुसलमानी सफर महिन्याच्या १०, ११ व १२ ह्या तारखास येथें मोठा उत्सव होतो. याखेरीज जवळच असलेला भुइकोट किल्लाहि प्रेक्षणीय आहे. किल्लयांत उत्खनन करून सांपडलेल्या जुन्या देवळांतील शिल्पकाम फार कोरीव व छान आहे.

**शिंगणापूर**:—हें क्षेत्र सातारा जिल्ह्यांतील दहिवडी गांवापासून सुमारे तेरा मैलांवर असून तेथील शंभु महादेवाचें मंदिर फारच प्रेक्षणीय आहे. देवळाचें शिखर व दीपमाळ हीं फार दुरून दिसतात. हें देऊळ शिवाजी महाराजांनीं बांधिलें. देवळाची बांधणी चालुक्य पद्धतीची दिसते. देवळाच्या समोर पश्चिमाभिमुख मोठा दगडी नंदी असून तेथेंच दोन प्रचंड घंटा टांगलेल्या आहेत. देवालयाच्या जवळच तीन इमारती असून त्यांपैकीं मधील इमारत शिवाजीमहाराजांचे वडील शहाजीराजांची समाधि आहे.

या समाधीला लागूनच पूर्वेकडे संभाजी महाराजांची समाधि असून ती शाहू महाराजांनीं बांधविली आहे. पश्चिम बाजूस असलेली समाधि कोल्हापूरच्या शिवाजीमहाराजांची आहे. ह्या डोंगरावर चैत्री पौर्णिमेस मोठी यात्रा भरते.

**शिवनेर** :—हा किल्ला जुन्नरजवळ असून तो इ. स. १४३६ मध्यें मलिकउल्तुजार नांवाच्या मुसलमान बादशहानें बांधिला. देवगिरीच्या हिंदुराजाच्या ताब्यांत हा होता व पुढें बहामनी व निजामशाहीच्या ताब्यांत तो गेला. येथें मुसलमानांच्या अमलांतील इमारती, मशिदी व थडगी आहेत. शिवनेरीचें महत्व शिवाजी महाराजांचा येथें जन्म झाला. ( इ. स. १६२७ ) त्यामुळें विशेष आहे. किल्ल्यांतील शिवाई देवीच्या प्रसादानें आपणाला मुलगा झाला म्हणून जिजाबाईनें आपल्या मुलाचें नांव शिवाजी ठेविलें. महाराजांचा जन्म ज्या इमारतींत झाला ती हल्लीं पडक्या स्थितींत आहे.

**हरेश्वर** :—हें क्षेत्र जंजिरा संस्थानांत सावित्री नदीच्या मुखापाशीं असून तें फार प्रसिद्ध व प्राचीन आहे. हरेश्वराचें मंदिर समुद्राजवळच एका टेकडीच्या पायथ्याशीं बांधिलें आहे. ह्याची स्थापना भगवान अगस्ति ऋषींनीं केली अशी कथा पुराणप्रसिद्ध आहे. देवळांत एका रांगेत चार पिंडी असून त्यांना ब्रह्मा, विष्णु, महेश व पार्वती ह्यांचीं प्रतीकें मानतात. हरेश्वराचें देवळाजवळच काळभैरवाचें देऊळ असून त्यांत जोगेश्वरी व बहिरी ह्या देवतांच्या मूर्ति आहेत. ह्या ठिकाणीं पिशाचबाधा झालेल्या व्यक्तीस गुण येतो असें समजतात. हरेश्वरापासून अर्धा मैलावर समुद्रांत शुक्लतीर्थ आहे. तेथें जातांना वाटेंत विष्णुपद लागतें. शुक्लतीर्थाच्या पूर्वेस गायित्री-सावित्रीचें संगमतीर्थ आहे. हरेश्वर येथें कार्तिक शुद्ध एकादशीस व महाशिवरात्रीस जत्रा भरते.

# १२

# महाराष्ट्रीय संस्थानें

**अक्कलकोट :—** हें संस्थान मुंबई इलाख्यांत सोलापूरच्या जवळ आहे. त्याचें क्षेत्रफळ ४९८ चौरस मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १०३९०३ आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें आठ लाख आहे. अक्कलकोटचा प्रदेश समुद्रसपाटीपासून १२०० फूट उंचीवर असलेलें सपाट मैदान असून बहुतेक वृक्षरहित आहे. संस्थानांत विहिरी पुष्कळ असून पाणी जवळ व विपुल आहे. संस्थानांतून बोरी नदी वाहत जाऊन भीमेस मिळते. पिकामध्यें बाजरी, तूर, अंबाडी, कापूस, ज्वारी, कापड, भुइमूग, विड्याची पानें, मिरच्या हीं प्रमुख असून बाहेरून गहूं, डाळी, मीठ, वगैरे जिन्नस येतात. राणोजी उर्फ फत्तेसिंग लोखंडे नांवाच्या शाहूच्या मानसपुत्राकडून अक्कलकोट संस्थानाची स्थापना झाली. येथील राजवंश भोंसले हें आडनांव लावितों. अक्कलकोटकर हे पहिल्या प्रतीचे सरदार असून त्यांस दत्तक घेण्याचा अधिकार आहे. सध्याच्या संस्थानिकांचें नांव राजा श्रीमंत विजयसिंह फत्तेसिंह भोसलें हे असून त्यांना राजा हा किताब मिळाला आहे. अक्कलकोट हें मुख्य राजधानीचें शहर असून तें जी. आय. पी. रेल्वेच्या अक्कलकोटरोडपासून सात मैलांवर आहे. येथील जुना राजवाडा, नवा राजवाडा, कांहीं छत्र्या व हायस्कूल ह्या इमारती उल्लेखनीय आहेत. राजवाड्याच्या शस्त्रागारांतील शस्त्रांचा संग्रह प्रेक्षणीय आहे. १९३७ पासून संस्थानांत प्राथमिक शिक्षण मोफत करण्यांत आलें आहे.

**इचलकरंजी :—**हें संस्थान कोल्हापूरच्या राजाच्या ताब्यांतील मांडलीक

संस्थान आहे. त्याचें क्षेत्रफळ २४० चौ. मैल असून,लोक संख्या सुमारे सत्तर हजार आहे. संस्थानचें उत्पन्न सवातीन लाखांचे आहे. संस्थानचा मूळ संस्थापक नारो महादेव वरवडेकर जोशी हा होय. हा जातीनें कोंकणस्थ ब्राह्मण होता. प्रसिद्ध मराठा सेनापति संताजी घोरपडे याची याच्यावर बहाल मर्जी होती; आणि त्यानेंच याला इचलकरंजी व अजरे हे गांव इनाम दिले होते. नारोपंतानें आपलें मूळचें जोशी हें आडनांव बदलून आपल्या धन्याचें घोरपडे हेंच आडनांव धारण केलें. इचलकरंजीकर हल्लीं देखील घोरपडे हेंच आडनांव लावतात. मुख्य उत्पन्नाच्या बाबी हातमागावरील लुगडीं, विड्याचीं पानें, भुइमुग, तंबाखु, मिरच्या व गूळ हीं आहेत. इचल-करंजी हें राजधानीचें शहर असून तें सदर्न-मराठा रेल्वेच्या हातकणंगलें स्टेशनापासून जवळ आहे. शहराची हवा निरोगी आहे. गांवांत शाळा, लायब्ररी, क्लब, इस्पितळ, नाटकगृह व गिरण्या आहेत. मुसलमानी पद्धतीचे मनोरे असलेला राजवाडा प्रेक्षणीय आहे. दरवर्षीं नवरात्रांत संस्थानची कुलदेवता श्री व्यंकटेश ह्याच्या नांवानें मोठी जत्रा भरते.

इंदूर :—हें संस्थान मध्य हिंदुस्थानांत असून त्याचें क्षेत्रफळ ९९०२ चौरस मैल व लोकसंख्या सुमारे सोळा लाख आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें दोन कोटी रुपयांचें असून, मुख्य उत्पन्नाच्या बाबी कापूस, कापड, तंबाखू व गहूं ह्या आहेत. ह्या संस्थानाची स्थापना मल्हारराव होळकरांनीं अठराव्या शतकांत केली. इंदूरच्या गादीवर सांप्रत हिज हायनेस यशवंतराव महाराज होळकर हे असून ते प्रजाहितदक्ष आहेत. शिक्षणाची सोय संस्थानांत चांगली असून सुमारे सातशे शिक्षणसंस्था आहेत. इंदूर हें राजधानीचें शहर असून तें खांडवा–रतलाम ह्या बी. बी. सी. आय. रेल्वेच्या मार्गावर आहे. इंदूर येथें एक सरकारी व एक मिशनचें अशीं दोन कॉलेजें असून, शिवाय संस्कृत पाठशाळाहि आहे. साहित्य व कला ह्यांना संस्थानचा चांगला आश्रय असल्यानें बरेच गुणीजन संस्थानच्या आश्रयानें पूर्वीपासून इंदूर येथें राहत आहेत. संस्थानच्या कारभारावर देखरेख ठेवण्याच्या हेतूनें एक लोकसभा

स्थापन करण्यांत आली असून त्यांत चौतीस लोकनियुक्त व सोळा सरकार नियुक्त सभासद आहेत.

**औंध** :—हें संस्थान सातारा जिल्ह्यांत साताऱ्यापासून आग्नेयीस २६ मैलांवर आहे. संस्थानचें क्षेत्रफळ ५०१ चौ. मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारी प्रमाणें ८८७२३ आहे. वसुल सुमारे चार लाखांचा आहे. संस्थानिक कोणासहि खंडणी देत नाहीत. संस्थानिकांचें घराणें देशस्थ शुक्ल यजुर्वेदी आहे. हल्लींचे अधिपति श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंत प्रतिनिधी हे बी. ए. असून चांगले चित्रकार आहेत. त्यांनीं आपल्या राज्यांत लोकांना सर्वस्वी जवाबदार अशी राज्यपद्धति सुरू केली आहे. राज्यांत ३२ ग्रामपंचायती असून, त्यांना दिवाणी-फौजदारी अधिकार दिलेले आहेत. किर्लोस्कर बंधूंचा व ओगले कंपनीचा असे दोन कारखाने संस्थानांत आहेत. पहिल्यांत शेतीचीं अवजारें, लोखंडी फर्निचर वगैरे होतें व दुसऱ्यांत कांचमाल उत्पन्न होतो. संस्थानच्या राजधानीचें शहर औंध हें असून तें प्रेक्षणीय आहे. येथें औंध सोप वर्क्स नांवाचा कारखाना आहे. राजवाडा, यमाईचें देऊळ, चित्रसंग्रहालय वगैरे प्रेक्षणीय आहेत.

**कुरुंदवाड** :—हें संस्थान कोल्हापूरच्या पोलिटिकल एजंटच्या देखरेखीखालीं आहे. येथील संस्थानिक पटवर्धन आडनांवाचे कोंकणस्थ ब्राह्मण असून, संस्थानच्या थोरली पाती व धाकटी पाती अशा दोन शाखा आहेत. थोरल्या पातींत कुरुंदवाड हें शहर व इतर ३७ गांवें आहेत. या पातीचें क्षेत्रफळ १८५ चौ. मैल असून लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ५२५५२ आहे. संस्थानांत मका, तांदूळ, गहूं, हरभरा व कापूस यांचें उत्पन्न मुख्य आहे. संस्थानिक पहिल्या वर्गाचे सरदार आहेत. उत्पन्न सुमारे तीन लाखांचें आहे. धाकट्या पातीचें क्षेत्रफळ ११४ चौ मैल असून लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ४६६०९ आहे. उत्पन्न सुमारे दोन लाखांचें आहे. कुरुंदवाडास पंचगंगा नदी असून जवळच तिचा कृष्णेशीं

संगम झाला आहे. येथेंच दोन्ही पातींचे अधिपती रहातात. पटवर्धन घराण्याचे मूळपुरुष हरभटबाबा यांचे तिसरे पुत्र त्रिंबकपंत अप्पा हे या संस्थानचे मूळ संस्थापक होत. थोरल्या पातीचे अधिपति श्री. चिंतामणराव भालचंद्र ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन हे असून त्यांना राजा हा किताब आहे. धाकट्या पातीचे अधिपति श्री. गणपतराव त्रिंबकराव ऊर्फ तात्यासाहेब पटवर्धन हे आहेत.

**कोल्हापूर** :—हें मुंबई इलाख्यांतील दक्षिणेकडील मोठें संस्थान आहे. छत्रपति शिवाजी महाराज भोंसले यांच्या घराण्यापैकीं हें संस्थान असल्यानें येथील महाराजांना छत्रपति असें म्हणतात. संस्थानचें क्षेत्रफळ ३२१७ चौरसमैल असून लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १०९२०४६ इतकी आहे. कोल्हापूरच्या सृष्टिसौंदर्यांत सह्याद्रीच्या रांगा मुख्य आहेत. यांवरील किल्ले व देवस्थानें प्रेक्षणीय आहेत. अशांत पन्हाळगड, पावनगड, विशाळगड यांसारखे किल्ले व ज्योतिबा, शिरोबा, धुळोबा, अलंप्रभु, रामलिंग इत्यादि देवळें आहेत. संस्थानांत कृष्णेशिवाय वारणा, पचगंगा, दूधगंगा, वेदगंगा, घटप्रभा व मलप्रभा इत्यादि नद्या आहेत. येथील हवा समशीतोष्ण आहे. इमारतीचा दगड व मुरुम संस्थानांत पुष्कळ ठिकाणीं निघतो. इमारती लाकूड, हिरडा, करडी, तीळ, भुइमुग, अंबाडी, गूळ, तंबाखू, कापूस इत्यादि उत्पन्नाच्या मुख्य बाबी आहेत. कोल्हापूर हें राजधानीचें मुख्य शहर असून, त्याची लोकसंख्या सुमारे एक लाख आहे. येथील राजवाडे, राजाराम कॉलेज, लॉ कॉलेज, बी. टी. कॉलेज, अंबाबाईचें देऊळ इत्यादि इमारती प्रेक्षणीय आहेत. कोल्हापुरास पुष्कळ देवळें असून त्यास दक्षिणकाशी असें म्हणतात. सांप्रत कोल्हापुरांत छत्रपति शहाजी महाराज राज्य करीत आहेत.

**ग्वाल्हेर** :—हें संस्थान उत्तर हिंदुस्थानांत असून त्याचें क्षेत्रफळ २६३९७ मैल व लोकसंख्या सुमारे चाळीस लाख आहे. राणोजी शिंदे यांनीं या संस्थानची स्थापना अठराव्या शतकांत केली. सध्यां ग्वाल्हेरच्या

गादीवर हिज हायनेस महाराजा जिवाजिराव शिंदे अलिजा बहादुर हे तरुण संस्थानिक आहेत. राज्यकारभारांत त्यांना निरनिराळ्या खात्याच्या दिवाणांकडून मदत होते. यांनीं आपल्या राज्यांत बऱ्याच सुधारणा घडवून आणिल्या आहेत. मजलिसे आम नांवाच्या लोकसभेंत लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण सरकारनियुक्तांपेक्षां अधिक आहे. संस्थानांत प्राथमिक, दुय्यम व उच्च शिक्षणाची सोय सर्व प्रमुख ठिकाणीं करण्यांत आली आहे. संस्थानांत मराठी भाषा बोलणाऱ्यांची संख्या सुमारे पंचवीस हजार आहे.

**जत** :—हें संस्थान मुंबई इलाख्यांतील विजापूर जिल्ह्यांत आहे. त्याचें क्षेत्रफळ ९८० चौ. मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १०७०३६ इतकी आहे. उत्पन्न सुमारें साडेचार लाखांचें असून राजधानीचें गांव जत हें आहे. संस्थानिकांचें मूळ आडनांव चव्हाण होतें. परंतु जतची जहागीर मिळाल्यापासून त्यांना डफळे हें नाव मिळालें. याचें कारण त्यांचे पूर्वज हे मूळचे (जत संस्थानातील) डफळापुर या गांवचे पाटील होते. संस्थानिकांचा मूळ पुरुष सटवोजीराव यांस विजापूरच्या आलि आदिलशहाकडून जतची जहागिरी मिळाली. सध्यां जतच्या गादीवर लेफ्टेनंट राजा श्रीमंत विजयसिंहराव रामराव ऊर्फ बाळासाहेब डफळे हे आहेत. जत संस्थानांत मोफत व सक्तीचें प्राथमिक शिक्षण व मोफत दुय्यण शिक्षण दिलें जातें. रामविलास राजमहाल व रामबाग हीं जत येथील प्रेक्षणीय स्थळें होत.

**जमखिंडी** :—हें संस्थान कोल्हापूरच्या पोलिटिकल एजंटाच्या हाताखालीं आहे. याचें क्षेत्रफळ ५२४ चौरस मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १२६२७२ आहे. पहिल्या प्रतीचे सरदार म्हणून येथील संस्थानिकांना मान असून त्यांना दत्तकाची परवानगी आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारे दहा लाखांचें असून, मुख्य पीक गहूं व कापूस यांचें आहे. संस्थानांत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे आहे. जमखिंडी येथील पुस्तकसंग्रह व अजबखाना प्रेक्षणीय आहेत. संस्थानिक पटवर्धन घराण्यापैकीं

आहेत. राजेसाहेब श्रीमंत शंकरराव अप्पासाहेब पटवर्धन हे सध्यां जमखिंडीच्या गादीवर आहेत. संस्थानांत मराठी शाळा, इंग्रजी शाळा, दवाखानें व म्युनिसिपालिटी इत्यादि संस्था आहेत.

**जव्हार** :—हें संस्थान ठाणें जिल्ह्यांत असून त्याचे क्षेत्रफळ ३०८ चौरस मैल असून लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ५७२६१ आहे उत्पन्न सुमारे चार लाखांचें असून, मुख्य उत्पन्नाच्या बाबी भात, नाचणी, ताग, तंबाखू व साग ह्या आहेत. संस्थानचा बहुतेक प्रदेश एक हजार फूटापेक्षां अधिक उंचीवर व सह्याद्रीच्या पठारावर असून तो नद्या व अरण्यांनीं व्यापिलेला आहे. जंगलांत वाघ, चित्ते, अस्वलें, तरस, सांबरें वगैरे जनावरें पुष्कळ आहेत. लोकसंख्येपैकीं शेंकडा ८५ वन्य जातीचे असून बाकीचे कोळी, कुणबी व इतर लोक आहेत. संस्थानिक महादेव नांवाच्या कोळी जातीचे आहेत. सध्यां गादीवर राजा प्रतापसिंह ऊर्फ यशवंतराव विक्रमसिंह हे आहेत. जव्हार हा राजधानीचा गांव असून, त्याची हवा थंड व निरोगी आहे. हल्लींच्या संस्थानिकांनीं व त्यांच्या वडिलांनीं गावची पुष्कळ सुधारणा केली आहे. जव्हार येथें बी. बी. सी. आय. रेल्वेच्या डहाणू स्टेशनापासून सडकेनें जातां येते.

**जंजिरा** :—हें संस्थान कुलाबा जिल्ह्यांत आहे. यांस हबसाण म्हणतात. याचें क्षेत्रफळ ३७७ चौरस मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १०३५५७ आहे. संस्थानचे आठ तपे अथवा महाल आहेत. संस्थानचा प्रदेश डोंगराळ असून, समुद्र किनाऱ्यास समांतर आहे. जंगलचें उत्पन्न बरेंच आहे. संस्थानांत एक इंग्रजी हायस्कूल, एक मराठी शाळा व ३६ हिंदुस्थानी शाळा आहेत. संस्थानिक शिद्दी वंशाचा असून सुनी पंथाचा मुसलमान आहे. त्यास नबाब ही पदवी आहे. गादीवर सध्यां हिज हायनेस सिद्दी महमदखान नवाबसाहेब असून त्यांना तेरा तोफांची सलामी आहे. मुरुड व श्रीवर्धन हीं मुख्य गावें आहेत. शेंकडा ८२ हिंदु व १७ मुसलमान आहेत. प्रमुख जाती आगरी, कोळी, कुणबी, महार, ब्राह्मण, प्रभु, मुसलमान,

शिद्दी या होत. मुंबई बंदरांतील बरेचसे खलाशी या संस्थानांतील असतात. मुख्य पीक भात, नागली, वरी, सुपारी आणि नारळ यांचें आहे. साग, चामडीं, हाडें, मासळी, ताग, नारळ वगैरे माल बाहेर जातो. संस्थानचें उत्पन्न सुमारें अकरा लाखांचें आहे. जंजिरा हे संस्थानच्या राजधानीचें गाव असून येथील किल्ला प्रेक्षणीय आहे.

देवास :—हें संस्थान माळवा रेसिडेन्सींत असून त्याच्या दोन पाती आहेत. मोठ्या पातीचें क्षेत्रफळ ४४९ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारे ८५ हजार आहे. येथें सांप्रत हिज हायनेस सर विक्रमसिंह पवार हे राज्य करीत आहेत. छोट्या पातीचें क्षेत्रफळ ४१९ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारे सत्तर हजार आहे. येथें सध्यां हिज हायनेस महाराजा सदाशिवराव खासेसाहेब पवार हे राज्य करीत आहेत. दोन्ही पातींचें राजधानीचें शहर देवास हेंच आहे. संस्थानांतून चंबळा, क्षिप्रा व लालीसिंध ह्या नद्या वाहतात. मुख्य पीक गहूं, ज्वारी, तूर, ऊंस, तंबाखू, व कापूस यांचें आहे. दोन्ही संस्थानचें उत्पन्न सुमारे प्रत्येकीं सात लक्ष रुपये आहे

धार :—हें संस्थान माळवा रेसिडेन्सींत असून, त्याचें क्षेत्रफळ १८०० चौरस मैल व लोकसंख्या २५३२५८ आहे. त्याचें उत्पन्न सुमारे तीस लाखांचें आहे. धारच्या गादीवर सांप्रत हिज हायनेस आनंदराव पवार राज्य करीत आहेत. येथें भिल्ली, हिंदी व नेमाडी या माळवी भाषा चालतात. मुख्य पीक ज्वारी, गहूं, मका, हरभरा, तीळ, बाजरी, तांदूळ, कापूस व अफू यांचें आहे. धारपासून चोवीस मैलांवर सुप्रसिद्ध मांडवगड असून, तेथील सृष्टिसौंदर्य प्रेक्षणीय आहे. धार हें राजधानीचें शहर असून तेथें एक हायस्कूल आणि मराठी, हिंदी, उर्दु व संस्कृत पाठशाळा आहेत. प्राथमिक शिक्षण मोफत आहे. हें गांव फार प्राचीन असून येथें पूर्वी भोजराजा राज्य करीत असे. येथें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे असे बरेच प्राचीन लेख व अवशेष आहेत.

फलटण :—हें संस्थान सातारा जिल्ह्यांत असून त्याचें क्षेत्रफळ ३९७

चौरस मैल व लोकसंख्या १९४१ च्या खाने सुमारी प्रमाणें ७१४७३ आहे. येथील संस्थानिकांचें घराणें निंबाळकरांचें होय. संस्थानचें उत्पन्न सुमारे आठ लाखाचें असून, मुख्य पीक ज्वारी, बाजरी, तूर, हरभरा यांचें आहे. फलटण हें संस्थानच्या राजधानीचें गांव असून येथें महानुभाव पंथियांचें एक जुनें देवस्थान, एक हायस्कूल, दवाखाना व म्युनिसिपालिटी हीं आहेत. महाराष्ट्रांतील राजघराण्यांत फलटणच्या निंबाळकरांचें घराणें गेल्या सहा-सातशे वर्षांपासून राज्योपभोग घेत आहे. धारच्या परमार राजांवर दिल्हीच्या सुलतानानीं वारंवार हल्ले केले त्या अवधींत निंबराज परमार नांवाचा एक पुरुष दक्षिणेंत फलटण नजीक शंभुमहादेवाच्या रानांत इ. स. १२४४ च्या सुमारास येऊन राहिला. निंबराज ज्या गांवीं राहिला त्यास निंबळक आणि त्यावरून त्याच्या वंशजास निंबाळकर असें नांव मिळालें. निंबराजाच्या वंशजांनीं पुढें फलटण हें गांव वसविलें आणि तेथें ते राहू लागले. फलटणच्या गादीवर सध्या मेजर राजा श्रीमंत मालोजीराव मुधोजीराव ऊर्फ नानासाहेब नाईक निंबाळकर हे आहेत.

**बडोदें** :—मुंबई इलाख्यातील हें सर्वांत मोठें संस्थान असून, त्याचें क्षेत्रफळ ८१७६ चौरस मैल व लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें २८५५००० आहे. नुकतेंच या संस्थानाला कित्येक लहान संस्थानें व जहा-गिरी जोडण्यांत आल्या आहेत. बडोद्यांत गायकवाडांचें राजघराणें राज्य-करीत असून इ. स. १९३९ पासून बडोद्याच्या गादीवर श्रीमंत प्रतापसिंह महाराज गायकवाड हे आहेत. हे सुविद्य व प्रजाहिततत्पर आहेत. गादीवर आल्याबरोबर यांनीं नवीन धारासभेची स्थापना करून कौन्सिलांत दोन लोकज्ञ दिवाणांची नेमणूक केली. याशिवाय त्यांनीं अनेक लोकोपयोगी सुधारणा करून आपल्या परमपूज्य आजोबाची (कै. सयाजीराव महाराज) श्रेष्ठ परंपरा चालू ठेविली आहे. बडोदें हें अत्यंत प्रगतिपर असें संस्थान असून, येथें प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत आहे. दुय्यम व उच्च शिक्ष-णाची सोयहि येथें आहे संस्थानांत आर्ट्स, सायन्स, कॉमर्स संस्कृत वगैरे

मिळून सहा कॉलेजें असून, कलाभवन नांवाच्या सुप्रसिद्ध संस्थेंत मेकॅनिकल, इलेक्ट्रिकल, सिव्हिल इंजिनियरिंग, पेंटिंग, डाइंग, व्हीविंग वगैरे शिक्षणक्रम शिकविले जातात. संस्थानांत सर्वत्र पुस्तकालयांचें जाळें पसरण्यांत आलें असून ही सोय मोफत ठेवण्यांत आली आहे. दवाखान्यांची अशाच प्रकारची सोय सर्वत्र आहे. बडोद्याच्या लष्करांत सर्व मिळून सुमारे आठ हजार सैनिक आहेत. राज्यकारभार लोकज्ञ व सरकारी अशा दिवाणाच्या कौन्सिल मार्फत चालतो. धारासभा नांवाच्या लोकसभेंत लोकनियुक्त सभासदांची संख्या सरकारनियुक्त सभासदांपेक्षां अधिक असते. बडोदें संस्थानांत मराठी बोलणाऱ्यांची संख्या सुमारे पसतीस हजार आहे. बडोदें हें राजधानीचें शहर असून येथील राजवाडे, पदार्थसंग्रहालय, चित्रसंग्रहालय, प्राणीसंग्रहालय, सेंट्रल लायब्ररी, सोन्याचांदीच्या तोफा वगैरे अत्यंत प्रेक्षणीय आहेत.

**भोर**:—हें संस्थान पुणें जिल्ह्यांत असून त्याचें क्षेत्रफळ ९२५ चौरसमैल आहे. त्याची लोकसंख्या १५५९६१ इतकी आहे. राजधानीचें शहर भोर हें असून तें पुण्यापासून ३० मैलांवर नीरा नदीच्या कांठीं वसलें आहे. राजवाडा, भोरेश्वर देवालय, रामबाग बंगला, हायस्कूल इत्यादि इमारती पाहण्यासारख्या आहेत. संस्थानचा बहुतेक मुलुख घाटमाथ्यावरील मावळांत आहे. भोरापासून उत्तरेस दोन मैलांवर भाटघर येथें नीरेचें मोठें धरण आहे. त्याचें पाणी उत्तर नीरा व दक्षिण नीरा या नांवाच्या मोठ्याला कालव्यांतून फार दूर नेलें आहे. घाटांवर मुख्य धान्यें भात, नागली, वरी, जोंधळा व बाजरी हीं आहेत. जंगलांत साग, हिरडा, जांभूळ, आंबा, फणस हीं मुख्य झाडें आहेत. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारे नऊ लाखांचें आहे. संस्थानचे मूळ संपादक शंकराजी नारायण गांडेकर हे देशस्थ ऋगवेदी ब्राह्मण असून त्यांचें मूळचें गांव गांडापूर (निजाम इलाखा) हें होतें. संभाजीच्या वेळीं रामचंद्र नीलकंठ अमात्य यांच्या हाताखालीं शंकराजी हा कारकुनी काम करीत होता. त्याचें शौर्य पाहून पुढें रामारामानें त्यास मदारुनमहाम (विश्वासनिधि) हा किताब व सचीवपद दिलें. हल्लीचे राजे श्रीमंत

रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंतसचीव हे आहेत. भोर संस्थानांतील रोहिडा, राजगड, प्रचंडगड (तोरणा), तुग, तिकोना, भोरप व सरसगड हे किल्ले प्रेक्षणीय आहेत.

**मिरज**—हें संस्थान सातारा जिल्ह्यांत असून त्यास मिरज मोठी पाती म्हणतात. याचें क्षेत्रफळ ३४२ मैलांचें असून लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १०८५४७ आहे. उत्पन्न सुमारे चार लाखांचें आहे. संस्थानचे मिरज, मोडनिंब व लक्ष्मेश्वर असे तीन अलग तालुके आहेत. मिरजेची जमीन काळी असून आंबे व चिंचेचें उत्पन्न चांगलें येतें लक्ष्मेश्वर तालुका धारवाड जिल्ह्यांत असून, त्याचा प्रदेश सपाट व रुक्ष आहे. येथील जमीन फार सुपीक आहे. मोडनिंब सोलापूर जिल्ह्यांत असून येथील जमीन कमी प्रतीची आहे. संस्थानची हवा आरोग्यकारक आहे. तांदूळ, गहूं, सागवानी लाकूड, धातूचीं भांडी हा आयात माल असून बाजरी, ज्वारी, हरभरा, गूळ, भुइमुग, तंबाखू कापूस, लुगडीं, पागोटीं, कांबळी, सतारी, वगैरे निर्गत माल आहे. तालुक्याच्या गावीं म्युनिसिपालिट्या आहेत. मिरज ही संस्थानची राजधानी असून येथें हायस्कूल, दवाखाना, सरकारी कचेऱ्या, टाऊन हॉल वगैरे इमारती आहेत. येथील संस्थानिक पटवर्धन घराण्यापैकींच आहेत. मिरजेचा किल्ला बहामनी राजांनीं इ. स. १४९३ पूर्वी बांधिला. पेशव्यांनीं तो निजामाकडून घेऊन गोविंद हरि पटवर्धनास सरंजामांत नेमून दिला. कै. श्री. बाळासाहेब पटवर्धनांच्या नंतर त्यांचे वडील चिरंजीव श्री. नारायणराव ऊर्फ तात्यासाहेब पटवर्धन हे मिरजेच्या गादीवर आहेत. त्यांना के. सी. आय. इ. व राजा हे किताब मिळाले आहेत.

**मिरजमळा**:—या संस्थानास मिरज छोटी पाती म्हणतात. हें साताऱ्या जिल्ह्यांत असून याचें क्षेत्रफळ १९६ चौ. मैल असून, लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ४६२९५ आहे. उत्पन्न सुमारे साडे तीन लाखांचें आहे. संस्थानचा प्रदेश सपाट असून सुपीक आहे. कृष्णा व वारणा ह्या मुख्य नद्या आहेत. हवा समशीतोष्ण व निरोगी आहे. खनिज पदार्थांत

इमारतीचा काळा दगड सापडतो. मीठ, कापड, सूत, रेशीम हे आयात व कापूस, गहूं, हरभरा हे निर्गत जिन्नस होत. बुधगांव ही संस्थानची राजधानि असून ती मिरजेपासून पांच मैलावर आहे. गांवांत सरकारी कचेऱ्या, शाळा, लायब्ररी, दवाखाना व राजवाडा आहेत. हरभट पटवर्धनांचेंच वंशज येथें राज्य करतात. सध्या श्रीमंत सर माधवराव हरिहरराव ऊर्फ बाबासाहेब पटवर्धन हे गादीवर असून त्यांना राजा हा किताब वंशपरंपरा मिळाला आहे.

**मुधोळ**:—हें संस्थान कोल्हापूर येथील पोलिटिकल एजंटाच्या ताब्यांत आहे. याचें क्षेत्रफळ ३६८ चौ. मैल असून लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारी प्रमाणे ७२४४७ आहे. उत्पन्न सुमारे पांच लाखांचें आहे. येथील संस्थानिक घोरपडे घराण्यांतील कौशिक गोत्री क्षत्रिय आहेत. त्यांच्या एका पूर्वजानें घोरपडीनें किल्ला सर केल्यामुळें त्यांना हें नांव मिळालें. मुधोळकर घोरपडे त्यामुळें अद्यापि घोरपडीस पवित्र मानतात. मुधोळकरांचा मूळ पुरुष चोलराव हा आदिलशाहींत सरदार होता. आदिलशहानें त्याला मुधोळची जहागीर, राजा किताब व मोरचेलाचा मान दिला. सध्यां मुधोळच्या गादीवर श्रीमंत राजा भैरवसिंह हे आहेत. संस्थानची जमीन साधारण सपाट, बरीचशी काळी व बाकीची माळ आहे. मोठी नदी घटप्रभा ही असून तिनें संस्थानचे बरोबर दोन भाग केले आहेत—खनिज पदार्थांत इमारती दगड व चुना निघतो. ज्वारी, बाजरी, राळे, हरभरा, तूर, ऊंस, विड्याचीं पानें ह्या मुख्य उत्पन्नाच्या बाबी आहेत मुधोळ हें राजधानीचें गांव जमखिंडीच्या दक्षिणेस सहा कोसांवर असून तें घटप्रभेच्या डाव्या कांठावर आहे. येथील म्युनिसिपालिटी १८७५ सालीं स्थापन करण्यांत आली.

**सावंतवाडी**:—हें संस्थान दक्षिण महाराष्ट्रांत असून त्याचें क्षेत्रफळ ९२५ चौरस मैल व लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें २५२७५० आहे. उत्पन्न सुमारे सात लाखांचें असून येथील राजघराणें सावंतांचे आहे.

सध्यां सावंतवाडीच्या गादीवर राजेबहाद्दर श्रीमंत शिवराम सावंत भोंसले हे असून ते अल्पवयी असल्यानें राज्यकारभार रीजन्सी मार्फत चालतो. संस्थानचा बराचसा भाग डोंगराळ असून, तांदूळ, नाचणी, वरी व नारळ हीं मुख्य पिकें आहेत. संस्थानांत सुमारे दीडशे शाळा असून त्यापायीं सुमारे एक लक्ष रुपयांचा खर्च होतो. नुकतेंच एक कॉलेजहि सावंतवाडीस निघालें आहे. सावंतवाडी हा गांव संस्थानची राजधानि असून तो वेंगुर्ल्यापासून १७ मैलावर आहे. सावंतवाडीस सुंदरवाडी म्हणतात.

**रामदुर्ग**:—हें संस्थान कोल्हापूरच्या पोलिटिकल एजंटाच्या हाताखालीं असून त्याचें क्षेत्रफळ १६९ चौरसमैल व लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें ४०११४ आहे. उत्पन्न सुमारे तीन लाखांचें असून, मुख्य पीक गहूं, हरभरा, बाजरी, तांदूळ आणि कापूस यांचें आहे. सुती कापडाचा येथें फार व्यापार चालतो. संस्थानांतील मुख्य धंदा साड्या विणणें, खण तयार करणें हा आहे. संस्थानचा भाग सपाट व वृक्षहीन असून जमीन काळी आहे. संस्थानांत मलप्रभा नदी वहात जाते. हिचे पाट काढले असून त्यांचा शेतीच्या कामीं उपयोग होतो. येथील संस्थानिक भावे घराण्यांतील आहेत. सध्यां रामदुर्गच्या गादीवर राजा श्रीमंत रामराव व्यंकटराव ऊर्फ रावसाहेब भावे राज्य करीत आहेत.

**सांगली**:—हें संस्थान दक्षिण महाराष्ट्रात असून त्याचें क्षेत्रफळ ११३६ चौरस मैल व लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें २९३३८१ इतकी आहे. उत्पन्न सरासरी सोळा लाखांचे असून, संस्थानिक पटवर्धन घराण्यापैकीं आहेत. हल्लींच्या संस्थानिकाचे नांव कॅप्टन हिज हायनेस मेहेरबान श्रीमंत सर चिंतामणराव धुंडिराव ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन असून त्यांना के. सी. आय. इ. व राजा ह्या पदव्या मिळाल्या आहेत. त्याना वैयक्तिक ११ तोफांची सलामी आहे. संस्थानांत शिक्षणाची सोय चांगली असून त्याप्रीत्यर्थ सुमारे एक लक्ष रुपये खर्च होतात. संस्थानच्या साही तालुक्यांत म्युनिसिपालिट्या आहेत. गूळ, हळद, तूप, तंबाखू, गहूं व

मिरच्या यांचा व्यापार सांगलीस मोठ्या प्रमाणावर चालतो. येथील तांब्या-पितळेचीं भांडीं व सोन्याचांदीचे दागिने विशेष प्रसिद्ध आहेत. सांगली हें राजधानीचें शहर असून तें चांगलें टुमदार असून कृष्णेच्या कांठीं आहे. गांवांत तीन हायस्कुलें, एक मुलींचें हायस्कूल, सरकारी कचेऱ्या, बँक, राज-वाडा, हॉस्पिटल इत्यादिच्या इमारती उल्लेखनीय आहेत.

**सांडूर**:—मराठ्यांचें दक्षिण हिंदुस्थानांतील हें एकुलतें एक संस्थान असून, तेथें सध्यां राजा हिंदुराव घोरपडे हे राज्य करीत आहेत. संस्थानांत मँगेनीझ हा बहुमोल खनिज पदार्थ निघतो. मँगेनीझ व चंदनी तेल ह्या मुख्य उत्पन्नाच्या बाबी आहेत.

# १४

## मराठी भाषेची स्तुति

### ( १ )

माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिकें !
परि अमृतातें ही पैजेसीं जिंके ।
ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेळवीन ॥

—ज्ञानेश्वर

### ( २ )

संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवि । मा प्राकृतीं काय उणीवी ।
नवीं जुनीं म्हणावी । कैसें कधीं सुवर्णसुमनें ॥ १ ॥
कपिलेचें म्हणावें क्षीर । मा इतरांचें काय नीर ।
वर्णास्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥ २ ॥
संस्कृतवाणी देवें केली । प्राकृत काय चोरांपासूनि आली ।
असो या अभिमानभुली । वृथा बोली काय काज ॥ ३ ॥

—एकनाथ

### ( ३ )

प्राकृत म्हणौनि दूषिती । तेच्चि या ज्ञाना वचती ।
भाषाच्चि केवळ भजती । ते मूर्ख कीं ना ? ॥ १ ॥
हातीं देतां नवरत्नें । मऱ्हाटेन बोलें न घेणें ।
आतां हानी तयाकारणें । ते दूरी नसे ॥ २ ॥

— दासोपंत

(४)

जैसी हरळांमाजी रत्नाखिळा ।
रत्नांमाजीं हिरा निळा ॥
तैसी भाषांमाजी चोखळा ।
भाषा मराठी ॥
जैसी पुष्पामाजी पुष्प मोगरी ।
कीं परिमळामाजी कस्तुरी ॥
तैसी भाषांमाजी साजिरी ।
मराठीया ॥
पखियांमध्यें मयोरू
रुखियांमध्यें कल्पतरु
भाषांमध्यें मानु थोरू
मराठीयेसी ॥
तारामध्यें बारा रासी ।
सप्तवारामाजी रविशशी ॥
या दिपींच्या भाषांमध्यें तैसी ।
बोली मराठीया ॥

—फादर स्टीफन्स

(५)

प्राकृत आणि संस्कृत । दोनींमाजी एकचि अर्थ ।
जैसा दोन स्त्रियांचा एकनाथ । दोन्ही हस्त एकाचेचि ॥ १ ॥
अज्ञलांस नकळे संस्कृतवाणी । जैसे आडांतील पाणी ।
परी दोरपात्रांवांचुनी । अशक्त जनीं कैंवि निघे ॥ २ ॥
ते तडागासि येतां त्वरें । तात्काळचि तृषा हरे ।
भोळे जन तारावया ईश्वरें । प्राकृत ग्रंथ निर्मिले ॥३॥

संस्कृत इक्षुरस अपार । त्याची प्राकृत हे साखर ।
सुज्ञ जन सुकुमार सेवणार । प्रेमरसीं मिळवूनियां ॥४॥

—श्रीधर

(६)

प्राकृत म्हणोनि निर्भर हासतील अतज्ज्ञ नीच मत्कृतीला ।
परि जाणशील बा तूं रसिक कविवरा मनी चमत्कृतिला ॥१॥
ग्रंथ प्राकृत दिसतो परि न प्राकृत विलोकितां नीट ।
गोपांत गोप भासे कृष्ण परि नयेचि पाहतां वीट ॥२॥
गीर्वाणें राघवाचें यश रसिकजनां लागतें फार मिष्ट ।
तैसे न प्राकृतानें अचतुर म्हणती मानिति तें न शिष्ट ॥
पीतां गोक्षीर कार्तस्वरमणिचषकें देतसें जेवि गोडी ।
सारज्ञाला पलाशद्रुमदलपुटकें सेवितां तें न सोडी ॥१॥

—मोरोपंत

(७)

म्हणतात जे 'मराठी भाषा होणार ही असे नष्ट;
मिळणार काय करुनी व्यर्थ हिला वांचवावया कष्ट ?'
त्यांना हेंच पुसा कीं 'मरणोन्मुख होय आपली माय
म्हणुनि औषध कांहीं पुत्रीं देऊं नये तिला काय ?'

—गं रा मोगरे

(८)

मराठी असे आमुची मायबोली, जरी आज ती राजभाषा नसे
नसो आज ऐश्वर्य या माऊलीला, यशाची पुढें दिव्य आशा असे
जरी पंचखंडांत ही मान्यता घे स्वसत्ताबळें श्रीमती इंग्रजी
मराठी भिकारीण झाली तरी ही कुशीचा तिच्या तीस केवीं त्यजी ?
जरी मान्यता आज हिंदीस देई उदेलें नवें राष्ट्र हें हिंदवी

मनाचे मराठे मराठीस ध्याती हिची जाणुनी योग्यता थोरवी
असूं दूर पेशावरीं उत्तरीं वा असूं दक्षिणीं दूर तंजावरीं
मराठी असे आमुची मायबोली, अहो ज्ञानदेवीच देखा खरी.
मराठी असे आमुची मायबोली, जरी भिन्नधर्मानुयायी असूं
पुरी बाणली बंधुता अंतरंगीं, हिच्या एक ताटांत आम्ही बसूं
हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडूं; वसे आमुच्या मात्र हृन्मंदिरीं
जगन्मान्यता हीस अर्पू प्रतापें, हिला बैसवूं वैभवाच्या शिरीं.
हिच्या लक्तरांची असे लाज आम्हां, नका फक्त पाहूं हिच्या लक्तरां
प्रभावी हिचें रूप चापल्य देखा, पडावी फिकी ज्यापुढें अप्सरा
न घालूं जरी वाङ्मयांतील उंची हिरेमोतियांचे हिला दागिने
मराठी असे आमुची मायबोली वृथा ही बढाई सुकार्याविणें.
मराठी असे आमुची मायबोली, अहो पारतंत्र्यांत ही खंगली
हिची थोर संपत्ति गेली उपेक्षेमुळें खोल कालार्णवाच्या तळीं,
तरी सिंधु मंथूनि काढूनि रत्नें नियोजूं तयांना हिच्या मंडणीं
नको रीण ! देवोत देतील तेव्हां, जगांतील भाषा हिला खंडणी.

—माधवराव पटवर्धन

# १५

# महाराष्ट्रस्तुति

(१)

बहु असोत सुंदर संपन्न कीं महा
प्रिय आमुचा एक महाराष्ट्रदेश हा ॥ ध्रु० ॥

गगनभेदि गिरिविण अणु नच तिथें उणें
आकांक्षांपुढति जिथें गगन ठेंगणें
अटकेवरि जेथील तुरंगिं जल पिणें
तेथ अडे काय जलाशयनदाविणें ?
पौरुषासि अटक गमे जेथ दुःसहा १

नग्न खड्ग करिं, उघडे बघुनि मावळे
चतुरंग चमूचेंही शौर्य मावळे
दौडत चहुंकडुनि जवें स्वार जेथले
भासति शतगुणित जरी असति एकले
यन्नामा परिसुनि रिपु शमित बल अहा २

विक्रम वैराग्य एक जागिं नांदती
जरिपटका भगवा झेंडाहि डोलती
धर्म—राजकारण समवेत चालती
शक्तियुक्ति एकवटुनि कार्य साधिती
पसरे यत्कीर्ति अशी विस्मयावहा ३

गीत मराठ्यांचें श्रवणीं मुखीं असो
स्फूर्ती दीप्ति धृतिहि देत अंतरीं ठसो

वचनिं लेखनींहि मराठी गिरा दिसो
सतत महाराष्ट्रधर्ममर्म मनिं वसो
देह पडो तत्कारणिं हीं असे स्पृहा ४

—श्री. कृ. कोल्हटकर

(२)

अहा देश कैसा छान
माझं गेलं देहभान
हिरवं हिरवं सारं रान
तिथं नागवेली पान
कसा पिकला गहूं ग हरभरा
हा शाळू मक्याचा तुरा ॥धृ॥
नदी वाहे अधर
जरीकांठीं पदर
महाराष्ट्र देश सुंदरा
सोनेरी गुढी मंदिरा ॥१॥
सह्याद्री रांग ही भली
रांगोळी जेवि शोभली
आमराई पेरु जांभळी
कोकिळा राघु शोभली
हें मखर केळीचें कसें कीं,
मोहक दिसे कीं,
त्यामाधि वसे कीं,
मनमोहना कीं,
ही मनोहरा, सुखसारा ॥२॥

—अज्ञात

श्रीसयाजी साहित्यमाला तसेंच श्रीसयाजी बालज्ञानमालेंत भौगोगिक विषयावर प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें :—

## श्रीसयाजी बालज्ञानमाला

| | | |
|---|---|---|
| १ | गिरनारचें गौरव (१) ज. पु. जोशीपुरा * | ०- ६-० |
| २ | पाटण सिद्धपुरचा प्रवास (६) रा. चु. मोदी * | ०- ६-० |
| ३ | पावागढ (७) र. व. देसाई * | ०- ६-० |
| ४ | सुरत (२१) भानुसुखराम मेहता * | ०- ६-० |
| ५ | बडोद्याचें वैभव (२७) जगजीवनदास मोदी * | ०- ६-० |
| ६ | बौद्ध गुहा (३६) प्रो. छोटालाल * | ०- ६-० |
| ७ | महाबळेश्वर (३७) श्रीकांत मेहता * | ०- ६-० |
| ८ | एलिचपूर (११४) य. खु. देशपांडे | ०- ६-० |
| ९ | सिद्धपुर (१२६) चिमनलाल डॉक्टर * | ०- ६-० |
| १० | मोढेरा (१२८) मणिलाल मिस्त्री * | ०- ६-० |
| ११ | पावागढ (१४१) रा. मा. भांबुरकर | ०- ६-० |
| १२ | देवगिरी (१४२) चिं. वि. जोशी * | ०- ६-० |
| १३ | पुणें (१४३) गो. ग. तळवलकर. | ०- ६-० |
| १४ | भडोच (१४६) काझी सैयद नुरुद्दिन हुसेन * | ०- १-० |
| १५ | वडनगर (१४९) कन्हैयालाल दवे. * | ०- ८-० |
| १६ | बडोदें (१५०) वि. स. वाकसकर. | ०- ६-० |
| १७ | नाशिक (१५४) रा. ग. हर्षे | ०- ६-० |
| १८ | आबु व आरासुर (१५९) म. ज. द्विवेदी * | ०- ६-० |
| १९ | काशी (१६८) डॉ. अ. स. अळतेकर. | ०-१०-० |

| | | |
|---|---|---|
| २० | जुनागढ (१७५) वि. स. गोगटे | ०- ६.० |
| २१ | सुरत-भा-१ (१७६) मं. ज. पाठकजी * | ०- ८-० |
| २२ | बडोदें (१७९) चंद्रशंकर भट* | ०- ८-० |
| २३ | सुरत (१८०) भा. र. मं. ज. पाठकजी * | ०- ८-० |
| २४ | चितोडगढ (१८१) आनंदीबाई जयवंत | ०- ६-० |

## श्रीसयाजी साहित्यमाला.

| | | |
|---|---|---|
| २५ | द्वारका (२९६) कल्याणराय जोशी * | १- १-० |
| २६ | महाराष्ट्र (३०२) डॉ. वि. पां. दांडेकर. | २- ८-० |

टीपः—ज्या नांवासमोर ताऱ्याचें चिन्ह आहे तीं पुस्तकें गुजराती भाषेंत लिहिलीं गेलीं आहेत.

# शब्दसूची